






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)
महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


मराठी अभ्यास परिषद



# । बा. सी. मर्ढेकर ।

सौंदर्यशास्त्र, कलाशास्त्र आणि कलावाद: वर वर ह्या तीन व्यवहारांचा परस्पर संबंध दिसत नाही. कदाचित तसा तो असण्याची आवश्यकताहि ह्यांच्यापैकी फारशी मानणार नाहीत. मनुष्य जीवनांत हे तीनही व्यवहार ह्या विविध वर्तुळांतून अलग अलग संभावना देतात. शिवाय प्रत्येक व्यक्तीच्या बुद्धि-भावना पुष्कळदा वेगवेगळ्या दृष्टींच्या अनंत-पडताळ्यांत हवें निरनिराळे आणि निरनिराळ्या तऱ्हांचे प्रसंग कदाचित उपस्थित होत असतात कीं त्यांत भिन्न भिन्न केली तरच जगणें शक्य. आणि भिन्न भिन्न वृत्तीनें ते सारे प्रसंग, काही घटना हवी आत्मनिष्ठ ठरवणें सोयीस्कर ठरते. त्यामुळे जगणें सुलभ होतें हें खरें; पण त्याबरोबरच जीवनाचें अखंड आकलन थोडेसें बाधित होतें हेंहि तितकेंच खरें. अखंड जीवनाचें हें सत्य त्या जीवनाच्या विविध भागांनाहि, विभागांनाहि लागू पडते. सौंदर्याच्या विषयी कलेच्या क्षेत्रांत हें जाणवलें तर नवल वाटायचें नाही. त्यांतल्या त्यांत योग्य हेंच की ह्यांच्या ह्या क्षेत्रांतील निरनिराळ्या व्यवहारांच्या दृष्टिकोनांतील असलेला संबंध उघड करण्याचा प्रयत्न केला तर त्याचें काम होत उपेक्षा आपण करीत नाही.

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका**

# भाषा आणि जीवन

। वर्ष १५ : अंक ३ । पावसाळा १९९७ ।






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मराठी अभ्यास परिषद

**अनुक्रम**



---

□ प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
□ संपादन समिती : कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर.
□ संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७, दूरध्वनी ५४५६०३
□ व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४, दूरध्वनी ३३३८६९
□ पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरणपृष्ठ तीन पहा.
□ सूचना : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.
□ या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशत: अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.
□ संपादक : कल्याण काळे, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी, मृणालिनी शहा.
□ मुद्रक : श्री वेदविद्या मुद्रणालय, ४१ बुधवार पेठ, जोगेश्वरी बोळ, पुणे ४११ ००२.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# हे वळण कुठले ?

एकोणिसाव्या शतकात इंग्रजी राजवट सुरू झाल्यावर मराठी भाषेला क्रमशः नवे रूप प्राप्त होत गेले. मुद्रणाचा प्रारंभ, पाठ्यपुस्तके, नियतकालिके इत्यादींची सुरुवात, नवीन शासनव्यवहार या सगळ्यामुळे भाषेला एकदम नवीन रूप प्राप्त होणे स्वाभाविक होते. मुद्रणाच्या सोयीमुळे 'सार्वजनिक गद्य' नावाचा प्रकार अस्तित्वात आला. मतप्रदर्शन, चर्चा, वादविवाद, खंडन-मंडन इत्यादीसाठी नियतकालिकांचे प्रभावी माध्यम उपलब्ध झाल्यावर तर जे गद्यलेखन होऊ लागले ते सगळे काही एका वळणाचे म्हणजे पद्धतीचे नव्हते. म.म.दत्तो वामन पोतदारांनी म्हटल्याप्रमाणे त्या काळात जी वळणे होती, ती अशी : १) गृहस्थी वळण किंवा जुने पेशवाई वळण २) शास्त्रीवळण किंवा संस्कृती वळण ३) इंग्रजी किंवा नवे भाषांतरी वळण आणि ४) संमिश्र वळण. या प्रत्येक प्रकाराचे काही विशेष पोतदारांनी सांगितले आहेत.

जोपर्यंत शिक्षणाचा फारसा प्रसार झालेला नव्हता आणि लेखन - वाचनाचा व्यवहार करणारा वर्ग मर्यादित होता. तोपर्यंत भाषेचे वळण अशा मोजक्या प्रकारांत सांगणे शक्य होते. गेल्या दीडशे वर्षांमध्ये लिहिणाऱ्या - वाचणाऱ्यांची संख्या अनेक पटींनी वाढली आहे आणि शंभर टक्के साक्षरता आणण्याच्या दृष्टीने शासनाची आणि समाजाची पावले पडत आहेत. अगदी शंभर टक्के साक्षरता साधली नाही तरी नव्वद टक्क्यांपर्यंत पोचणे अशक्य नाही.

भाषेचे वळण यापुढे ठराविक असे राहणार नाही. लेखक, त्याच्यापुढील वाचकवर्ग, त्याने स्वीकारलेला लेखनप्रकार आणि त्या त्या कालखंडातील विविध गरजा यांचा परिणाम होत राहणे अटळ आहे. त्यामुळे विशिष्ट व्यक्तीच्या भाषेचे वळण अशी व्यक्तिसापेक्ष गणना करणे रूढ झाले आहे. म.फुले, विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यापासून अलीकडच्या लेखकांपर्यंत भाषेची वेगवेगळी वळणे ओळखता येतात.

साहित्यिकांनी केलेला भाषेचा वापर हे भाषेचे एक अगदी मर्यादित अंग होय. सर्व साक्षर - वर्गाचा साहित्याशी सतत संबंध येतोच, असे नाही. जीवनाची सर्व अंगे ज्या भाषेने व्यापलेली असतात, अशा भाषेशी मात्र प्रत्येकाचा संबंध येत असतो.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

वृत्तपत्रे, नियतकालिके यांच्या रूपात भाषेच्या लिखित आविष्कारांशी सर्वसामान्य साक्षर निगडित असतात. तर आकाशवाणी, दूरदर्शन अशा प्रसार माध्यमांची सर्वसामान्य श्रोत्यांना चांगली ओळख असते. साहजिकच प्रत्येक भाषेची अंगभूत वैशिष्ट्ये टिकविण्याची जबाबदारी वृत्तपत्रे व अन्य प्रसारमाध्यमे यांच्यावरच असते. ''दैनिक वृत्तपत्रांचे काम नेहमीच घाईगडबडीने होत असते. अंक वेळेवर निघण्याचा ताणही असतो. त्यामुळे भाषेच्या अचूक वापराकडे दुर्लक्ष होऊ शकते.'' अशी आपली बाजू पत्रकारांकडून अनेकदा मांडली जाते. कामाचा ताण असतो हे खरे असले तरी ते भाषादोषांचे समर्थन होऊ शकत नाही. प्रत्येक दैनिकाच्या संपादकवर्गात एक तरी भाषातज्ज्ञ असेल तर असे दोष टाळणे अशक्य नाही. पण अशा कुणाची नेमणूक झाल्याचे आढळत नाही. वृत्तसंपादक हे पद अनेक दैनिकांत असते. पण कुठल्या बातमीला कुठे स्थान द्यायचे, कुठला मजकूर बाजूला ठेवायचा, असल्याच बाबींकडे लक्ष पुरविले जाते. भाषेची पुरेशी जाण आणि अभ्यास नसलेल्यांकडूनच बातम्या लिहिल्या जातात किंवा भाषांतरे केली जातात. रोजच्या रोज त्याच त्या चुकांचे दर्शन घडत राहते, त्याचीच सवय होते आणि हळूहळू आपण लिहितो तेच बरोबर असे वाटायला लागते. मराठीचा वापर विविध क्षेत्रांत वाढावा हे योग्य असले तरी मराठीचे मराठीपण बिघडविण्यात त्याचे पर्यवसान होत नाही ना, यासाठी सावध असले पाहिजे. शब्दांचा सैलपणाने उपयोग, इंग्रजी किंवा हिंदी वळणाचे शब्द मराठीत वापरणे, अयोग्य प्रत्यय आणि शब्दयोगी अव्ययांना मिळणारे स्थान यामुळे अनेक दैनिकांमधून मराठीचे बेंगरूळ रूप दिसून येते, त्याकडे आजवर या क्षेत्रातल्या अनुभवी व्यक्तींनी अनेकदा लक्ष वेधले आहे. पण अज्ञान, अनास्था आणि उदासीनता यामुळे स्थिती अधिकच बिघडण्याच्या मार्गावर आहे.

मुंबई - पुण्याच्या अनेक दैनिकांमदून नेहमी दिसून येणारी ही काही शब्दरूपे पाहा :

' लक्षणे दिसत आहेत ' यासाठी '**संकेत मिळत आहेत**', ' यामागची कारणे अशी असावीत ' साठी '**तर्क दिला जात आहे**' सावध किंवा दक्ष ऐवजी '**सतर्क**', ' कायदा अंमलात येईल ' ऐवजी कायदा **जारी** होईल. सैन्याच्या अधिक तुकड्यांची नेमणूक करण्यात आली ऐवजी **तैनात** करण्यात आली, दिल्लीतील कार्यालयाऐवजी **दिल्लीस्थित** कार्यालय, असे करणे जरूरीचे आहे' याऐवजी असे करणे **जरुरी** आहे. असले शब्दप्रयोग सध्या रोजच वाचावे लागत आहेत. कामकाज पूर्णपणे बंद पडलेऐवजी ' ठप्प ' झाले ही शब्दयोजना मान्य होण्यासारखी आहे. पण बांधकाम पाडलेऐवजी बांधकाम **तोडले** अशी मराठीची मोडतोड सर्रास चालू आहे. ' कमी ' हे अनिश्चित संख्यावाचक विशेषण आहे हे आता बहुतेकजण विसरलेले दिसतात. हिंदीच्या प्रभावामुळे किंवा अंधानुकरणामुळे कमतरता / उणीव या नामाऐवजी कमी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

हे विशेषण वापरताना आपण चुकतो आहोत हे कुणालाच जाणवेनासे झाले आहे. ('या, **तुमचीच कमी होती**' हे एका नाटकाचे नाव म्हणजे या चुकीवर शिक्कामोर्तबच म्हणावे लागेल.) **कथित** भ्रष्टाचार, **कथित** गुंड, **कथित** आरोप अशा अनेक शब्दांमध्ये सध्या 'कथित' चा इतका सुळसुळाट झाला आहे की उद्या कुणी 'कथित देश', 'कथित सरकार' असे म्हटले तरी आश्चर्य वाटणार नाही! ही कथितची आयात हिंदीमुळे झाली हे उघड आहे. आरोपीला 'ऐन गुन्हा घडताना पकडलष' या ऐवजी 'रंगे हाथ' पकडले म्हणण्याचा मोह व्हायला हरकत नाही. पण आपण दुसऱ्या भाषेतला वाक्प्रचार सहेतुक योजतो आहोत हे सुचविण्यासाठी अवतरणचिन्हाचा उपयोग करायला नको काय? 'रंगे हाथ' हे सुध्दा Red handed चे हिंदी रूप आहे. 'रक्ताने हात माखलेले असतानाच' हा प्रयोग लक्षणेने सर्व प्रकारच्या गुन्ह्यांसाठी केला जातो. लाच घेताना पकडले तरीही 'रंगे हाथ'च . मराठीत यासाठी नेमका शब्दप्रयोग नाही. तरीही मराठीत हा शब्दप्रयोग नाही तरीही मराठीत हा शब्द योजताना दुसऱ्या भाषेतून तो स्वीकारला आहे हे सुचविले पाहिजे. अशी आणखी उदाहरणे दाखविता येतात.

नागपूरकडील मराठी दैनिकांमध्ये तर हिंदी शब्दांचे प्रमाण अधिकच आढळते. (त्याला बरीच कारणे आहेत.) वर्तमानपत्र कुठूनही निघत असो, व्यापारी संस्थांच्या जाहिराती त्यातून ज्या प्रकाशित होत असतात, त्यातील मराठीची मोडतोड तर पैसे मोजूनच केली जात असते. अमुक एका साबणामुळे कमालीची '**ताजगी**' येते असे जाहिरातीमधील बाई सांगत असते. आता मराठीत 'तजेला' किंवा 'ताजेपणा' येतो. हे त्या बाईला कसे माहीत असणार? दुसऱ्या एका जाहिरातीत कपडे धुण्याचा अमूक एक साबण पुष्कळ दिवस '**चालतो**' असे सतत सांगितले जाते. आता मराठीत अशी वस्तू 'चालत' नाही तर 'टिकत' असते हे कोण लक्षात घेणार? वृत्तपत्रे, आकाशवाणी आणि दूरदर्शन वरून असल्या मराठीचा सतत मारा होत असतो. आता हे सगळे खपते असे म्हटल्यावर चित्रपट - गीतात 'पतंग **माझी कटली**' असले भयंकर मराठी कानावर पडणारच!

आकाशवाणीवरील बातम्यांकडे लक्ष पुरविल्यास भाषेच्या दृष्टीने संमिश्र प्रतिक्रिया व्यक्त होऊ शकतील. महाराष्ट्रात आज आकाशवाणीची बहुतेक जिल्ह्यागणीक केंद्रे असल्यामुळे निवेदने किंवा अन्य कार्यक्रम, उद्घोषणा इत्यादी बाबतींत कोणत्या प्रकारची मराठी कानांवर पडते, हे त्या त्या ठिकाणचे श्रोतेच ठरवू शकतील. दिल्लीहून दिवसातून तीन वेळा प्रसारित होणाऱ्या मराठी बातम्या महाराष्ट्रातील सर्वच केंद्रे सहक्षेपित करीत असल्यामुळे याच बातम्यांमधील मराठीबद्दल बोलणे सोयीचे होईल. भाषेचे नेमके उच्चारण, बातम्यांमधील आशय समजण्याची क्षमता, शब्दांमधील आघात व विराम तसेच वाक्यांमधील आरोह-अवरोह आणि प्रसारणयोग्य आवाज हे सगळे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

जमून येण्यावर बातम्यांची परिणामकारकता अवलंबून असते. (याबाबतीत बी.बी.सी. चा आदर्श मानण्यासारखा आहे.) काही दशकांपूर्वी मराठीचे वृत्तनिवेदक आपल्या कामात अचूकपणा राखण्याच्या बाबतीत दक्ष असत. तो गुण आता कमी झाल्याचे निदान नवख्या वृत्तनिवेदकांबाबत म्हणावे लागते. अलिकडे एका निवेदिकेने मदर तेरेसा '**कलावश**' झाल्याचे (कालवश नव्हे) दहा मिनिटांच्या बातम्यांत तीन वेळा सांगितले! तर दुसऱ्या एका निवेदिकेने 'हरिकृष्ण शास्त्री' यांच्या निधनाचे वृत्त देताना 'हरिकिसनसिंग' असा नामोल्लेख केला. वाचताना अशा चुका झाल्यास क्षमायाचनापूर्वक दुरुस्ती करण्याची पध्दत आहे. पण असे काही न झाल्यामुळे या चुका अज्ञानमूलक आहेत असे म्हणावे लागते.

पण प्रश्न असल्या चुकांचा नाही. दिल्लीतील बातम्या इंग्रजी आणि हिंदीवरून अनुवाद करून तयार केल्या जात असल्यामुळे शब्दयोजना मराठी वाटेल, याबद्दल दक्ष राहण्याची फार आवश्यकता असते. (त्याचबरोबर बातम्यांमधील गावांची व व्यक्तींची नावे जर मराठी असतील तर ती इंग्रजी - हिंदीमध्ये यथायोग्य उच्चारली जात आहेत ना, यावर लक्ष ठेवणे हेही तेथील मराठी अधिकाऱ्यांचे काम असले पाहिजे.)

'प्राईम मिनिस्टर' साठी मराठीत पूर्वीपासून 'पंतप्रधान' हा शब्द रूढ असताना, हिंदीच्या अनुकरणाने मराठीतही '**प्रधानमंत्री**' हे रूप आकाशवाणीने आणले. त्याची काही गरज नव्हती. अजून बहुतेक वृत्तपत्रे मराठीत पंतप्रधान असेच म्हणतात. (गुजरातीने वडाप्रधान किंवा उर्दूने वजीर - ए- आझम ही आपापली रूपे सोडलेली नाहीत हे लक्षात घेण्यासारखे आहे.

पुढाऱ्यांनी किंवा उच्चपदस्थांनी दौऱ्यावर जाणे मराठीत रूढ आहे. पण आकाशवाणीच्या बातम्यात अशा व्यक्ती '**भेटीवर**' ही (भेटीला नव्हे) जात असतात. आपण 'परिस्थिती**चा**' सामना केला पाहिजे (परिस्थितीशी नव्हे) असे आपल्याला अनेक मंत्री रोजच्या रोज सांगत असतात. अपघातात सापडलेल्यांच्या 'कुटुंबियां**प्रती**' प्रधानमंत्र्यांनी सहानुभूती व्यक्त करण्याचा उपचार त्यांना रोजच पार पाडावा लागत आहे. राष्ट्रपती जनतेला 'संबोधित' करतील, राष्ट्राच्या नावाने (राष्ट्राला उद्देशून नव्हे, तर 'राष्ट्र के नाम' प्रमाणे) 'संदेश' देतील आणि 'विधिवत्' (रीतसर नव्हे) कुठल्या तरी 'समारोहा' चे उद्घाटन करतील हे आता नेहमीचे झाले असल्यामुळे त्याचे काही वाटेनासे झाले आहे. तरीही अनेकदा प्रश्न पडतो की मराठीचे हे वळण कुठले?

□ ■

**गं. ना. जोगळेकर**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

# प्राचीन शिक्षण-पद्धतीतील खाचखळगे

वा. बा. भागवत

शिक्षण हे जीवनाचं एक अटळ अंगच आहे. त्यामुळे ते कोणत्याही प्राण्याच्या जन्मापासूनच सुरू होते आणि अगदी श्वासोच्छ्वासासारखे चालूच असते. रोजच्या नित्य अनुभवातून प्राणिमात्र नवनवीन ज्ञान त्याला स्वाभाविकपणे मिळालेल्या डोळे, कान वगैरे साधनांनी अगर अटकळीने (शास्त्रीय भाषेत प्रत्यक्षाने आणि अनुमानाने) मिळवीत असतो; आणि त्या ज्ञानाच्या शिदोरीवर आपला जीवनप्रवास सुखसमृद्ध करण्यासाठी झटत असतो. हीच खरी अनौपचारिक स्वाभाविक ज्ञानाची प्रक्रिया होय.

ह्या अनौपचारिक ज्ञानप्रक्रियेत नको असलेले ज्ञान पदरी पडणे, पाहिजे असलेले योग्य वेळी न मिळणे किंवा ते मिळविण्यासाठी फार सायास करावे लागणे; पुढे कधीतरी उपयोगी पडेल, या आशेने ज्ञानाचे ओझे सांभाळावे लागणे अशा अनेक गैरसोयी अनंतकालच्या प्रवासी माणसाला जाणवू लागल्या असाव्या. काही नियोजनपूर्वक आखणी केल्यास ह्या गैरसोयी अगर गोंधळ काही प्रमाणात तरी दूर होतील, असा विचार माणसाच्या मनात आला असावा. आणि त्या विचारातून काही नियोजन सुरू झाले असावे. ते नियोजन म्हणजेच एक प्रकारची शिस्त. उपचार, रेखीवपणा होय. त्या उपचारालाच शिक्षणपद्धती असे म्हणता येईल. ही प्रक्रिया एखाद्या भूखंडाची किंवा कालखंडाची नाही, तर ती सार्वकालिक आणि सार्वदेशिक अशी आहे. तथापि, त्या त्या भूखंडातील भौगोलिक परिस्थिती आणि त्या त्या काळाची विशेष गरज ह्यानुसार त्या उपचारामध्ये अर्थात शिस्तीमध्ये वेगवेगळेपणा अपरिहार्यपणे अगदी प्रारंभापासून उत्पन्न झाला आणि माणसातील स्वाभाविक परंपराप्रेमाने तो जोपासला गेला, कुरवाळला गेला, इतकेच नव्हे, तर तो त्याच्या अस्मितेचा अविभाज्य असा भाग बनला.

भारतातील प्राचीन शिक्षण-पद्धती ह्याच प्रक्रियेने हजारो वर्षे साकारली आणि गेल्या शतकाच्या अखेरपर्यंत जशीच्या तशी चालू हिली. राजकीय घडामोडींचा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

त्या शिक्षणपद्धतीवर काही परिणाम झाला नाही. भारतीय राजांना किंवा अधिकाऱ्यांना त्या शिक्षणपद्धतीबद्दल स्वाभाविकपणे आत्मीयताच वाटत होती; तर दहाव्या शतकानंतर आलेल्या परकीय राजवटींनी त्या शिक्षणपद्धतींबाबत उदासीन, तटस्थ धोरण स्वीकारल्यामुळे ती जशीच्या तशी चालूच राहिली.

एकोणिसाव्या शतकाच्या मध्यास भारतात ब्रिटिशांची राजवट सर्वदूर स्थिरावल्यावर ती राजवट कायम चालविण्यासाठी आणि तिची पकड अधिक बळकट करण्यासाठी येथील पांढरपेशांचे सहकार्य त्यांना जरूर वाटले. त्याच वेळी परकीय आणि काही भारतीय शिक्षणतज्ज्ञांनाही भारतातील प्राचीन शिक्षणपद्धतीतील दोष व उणिवा फार बोचू लागल्या. म्हणून राज्यकर्त्यांच्या सोयीने भारतात पाश्चात्त्य शिक्षण-पद्धती सुरू झाली. मुख्यत्वेकरून व्यावहारिक लाभ, त्याचबरोबर विषयांचे वैविध्य, संग्राहक विचारसरणी, तौलनिक अभ्यास, इत्यादी गुणांमुळे तीच शिक्षणपद्धती सर्वमान्य होऊन स्थिरावली, तर प्राचीन शिक्षणपद्धती येथील संस्थानिक, जहागीरदार वगैरे धनवंतांनी परंपरेच्या अभिमानाने, धार्मिक श्रद्धेने एक अस्मितेचा भाग म्हणून टिकविण्याचा प्रयत्न केला. अर्थात स्वातंत्र्यानंतर संस्थाने, जहागिरी संपल्या व त्या प्राचीन शिक्षणपद्धतीने चालू ठेवलेल्या पाठशाळाही संपून गेल्या.

प्राचीन शिक्षणपद्धतीत शिक्षणाचे विषय धर्म, तत्त्वज्ञान, व्याकरण, पुराणे, काव्य, साहित्य असे मुख्यत्वेकरून वाङ्मयस्वरूपच होते. तांत्रिक, व्यावसायिक, प्रायोगिक शिक्षण त्या वेळच्या सामाजिक लोखंडी चौकटीमुळे परंपरेने घरातच मिळत असे. सुताराचा मुलगा वडिलांकडून घरीच त्याच्या व्यवसायाला जरूर ते व्यावसायिक शिक्षण मिळवत असे. इतरांना या शिक्षणाचा काही फायदा नसे. कारण -

**‘येनास्य पितरो याता: येन याता: पितामहा:**
**पथा तेनैव गन्तव्यम् एष धर्म: सनातन: ।**

या सनातन धर्माची पक्की पकड सर्व समाजावर होती. म्हणूनच मीमांसावार्तिककार कुमारिलभट्ट व्याकरणाची व्यर्थता सांगण्याच्या संदर्भात म्हणतात की,

**यथैव लोकसिद्धत्वात्कृष्यादेर्लक्षणं वृथा ।**
**तथैव वेदसिद्धानां शब्दानां लक्षणं वृथा ।।**
**लोकसिद्धप्रयोगे तु लक्षणं स्यादनर्थकम् ।**

(तन्त्रवार्तिक १.३.२४)

(लोकांमध्ये पूर्वीच सिद्ध असल्याने कृषिशास्त्र व्यर्थ, तसेच वेदातील आणि लोकांतील शब्द पूर्वसिद्ध असल्याने व्याकरणशास्त्रही व्यर्थ होय.)

अशा रीतीने शेतीचे शिक्षण शेतकऱ्याच्या मुलाला अनायासेच त्या वेळी मिळत असल्याने शेतीचे शिक्षण देणारी महाविद्यालये अगर स्वतंत्र कृषिविद्यापीठे यांची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

गरज नव्हती. आज केवळ महाराष्ट्रातच चार कृषिविद्यापीठे शेतीच्या नवनवीन प्रयोगांसाठी, शिक्षणासाठी आणि ते प्रायोगिक नवीन ज्ञान शेतकऱ्यांपर्यंत पोहोचविण्यासाठी कार्यरत आहेत. त्या वेळी त्याची काही जरुरी भासली नाही. तात्पर्य त्या वेळच्या सामाजिक परिस्थितीनुसार शिक्षण म्हणजे केवळ वाङ्मयीन शिक्षण एवढेच अभिप्रेत होते व तेच पाठशाळांमधून दिले जात असे.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात प्राचीन पद्धतीने शिक्षण देणाऱ्या पुष्कळ पाठशाळा देशामध्ये बऱ्या परिस्थितीत होत्या; पण पाश्चात्त्य शिक्षणपद्धतीकडे अनेक कारणांनी उत्पन्न झालेले आकर्षण आणि चांगला बुद्धिमान वर्ग त्या नवीन पाश्चात्त्य शिक्षणाकडे स्वाभाविकपणे खेचला जात असल्यांमुळे त्या पाठशाळांची उतरती कळा सुरू झाली. विसाव्या शतकाचा पूर्वार्ध प्राचीन शिक्षण-पद्धतीचा अस्तकालच ठरला. अस्तकालामध्ये कोणत्याही सामाजिक, धार्मिक व्यवस्थेचा फक्त सांगाडाच राहतो. म्हणजे बाह्य देखावे, निर्जीव कर्मकांड आणि पारंपरिक श्रद्धा एवढेच टिकवणे शक्य असते. तिचा अंतरंग आत्मा क्रमाक्रमाने निघून जात असतो. तीच प्रक्रिया ह्या अर्धशतकात प्राचीन शिक्षणपद्धतीबाबत घडत राहिली.

प्राचीन शिक्षणपद्धतीचे शास्त्राची व्युत्पत्ती, शास्त्राची उपस्थिती, सभा पाण्डित्य, सहाध्ययन, स्वावलंबन, आदर्श गुरूंच्या सहवासामुळे होणारे सुसंस्कार, इत्यादी अनेक गुण आहेत. पण ही सर्व भूषणे क्रमाक्रमाने गळून गेली. दागिने गेले, पण नाकाचे-कानाचे भोक या फक्त खुणा राहिल्या अशी अगदी दयनीय स्थिती बहुतेक पाठशाळांची झाली. प्राचीन काळी आणि इतिहासकाळातसुद्धा सर्वच मानवी जीवनावर धर्माची विशेष करून कर्मकांड, शुभ-अशुभ शकुन, पारंपरिक अनेक समज इत्यादींची सावट जबरदस्त होती. शिक्षणक्षेत्रही त्याला अपवाद नव्हते. इतकेच काय, शिक्षण हे धर्माचेच एक अंग अशी पक्की श्रद्धा आणि त्यानुसार शिक्षणाची सर्व आखणी व अंमलबजावणी होत होती. पण त्या काळात तर ते बाह्य स्वरूपच त्या शिक्षणपद्धतीचे व्यावर्तक लक्षण झाले होते.

व्यवस्था-नियोजन करायचे, तर काही नियम, निर्बंध आवश्यक असतातच, हे खरे. पण ते नियम देशकालपरिस्थिती आणि मुख्य उद्दिष्ट या सर्वांशी सुसंगत ठेवले आणि परिस्थित्यनुसार जरूर ते फेरबदल केले, तरच ते नियोजन लाभकारक ठरते. देश, काल, परिस्थिती नेहमी बदलत असते. त्यानुसार नियमांचा सांगाडा बदलला नाही, तर नवनवीन साधने वापरताच येणार नाहीत व मागील अनुभवाचा नवीन काळाला काहीच उपयोग होणार नाही.

व्याकरणसूत्रकार पाणिनीचे मरण त्रयोदशीला झाले, असा केवळ पारंपरिक समज म्हणून व्याकरणशास्त्राध्ययनाला त्रयोदशी पूर्ण वर्ज्य.

**'अष्टमी हन्त्युपाध्यायं शिष्यं हन्ति चतुर्दशी ।**



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अमावास्योभयम् हन्ति प्रतिपत्पाठनाशिनी ॥ '
' अमावास्या गुरुं हन्ति शिष्यं हन्ति चतुर्दशी ।
ब्रह्माष्टमीपौर्णमास्यौ तस्मात्ताः परिवर्जयेत् ॥ '

अशा प्रकारच्या स्मृतिपुराणातील वचनानुसार अध्ययनकालाची योग्यायोग्यता ठरविली गेली आणि शतकानुशतके निमूटपणे चालू राहिली. या वचनांचा वैज्ञानिक खरेखोटेपणा पडताळून पाहण्याची आवश्यकता कोणालाच वाटली नाही. कारण केवळ तशी शंका येणे म्हणजे सुद्धा शुद्ध पाखंडच. शिवाय ' व्यवहारे भाट्टनयः ' ह्या सर्वमान्य सिद्धांतानुसार ज्यांना धार्मिक बाबतीत सर्वाधिकार दिले गेले, ते कर्ममीमांसक अशा श्रुति-स्मृति-पुराणातील वचनांना केवळ अर्थवाद (कल्पितघटना, कल्पित कार्यकारणभाव) समजत. ती वचने खऱ्या-खोटच्या निकषाच्या पलीकडील असतात. फक्त त्यांनी सूचित केलेले आचार पाळणे अगर निंदिलेले टाळणे एवढेच आपले त्या वचनाशी नाते. आहार, विहार, उच्चार, पोशाख वगैरे सर्व बाबी परंपरेने पक्क्या ठरलेल्या असत आणि अगदी काटेकोरपणे त्या पाळाव्या लागत. आरंभ कोणत्या प्रकरणाने करायचा, कोणते वाचन केव्हा करायचे, अभ्यासासाठी साधने म्हणजे पोथ्या, दिवे वगैरे कसे वापरायचे, यासंबंधी चालत आलेल्या परंपरा अगदी अनादी, अपौरुषेयच. त्यांत थोडाही फरक करता येत नसे. ' असे का? ' हा प्रश्न विचारण्याचा अधिकार कोणालाच नव्हता. काही पाठशालांत तर रात्री समईचाच वापर करावा लागे. रॉकेलचे दिवे पूर्ण निषिद्ध होते. असा फक्त सांगाडा चालू शतकाच्या पूर्वार्धात सर्वत्र आढळून येत होता.

बंगालमध्ये मोठ्या प्रमाणात जमीनदारपद्धती होती आणि बहुतेक मोठे जमीनदार एक धार्मिक पुण्यदायक अनुष्ठान म्हणून आपल्या गावी संस्कृत शाळा चालवीत. अशाच एक छोट्या गावी एका जमीनदाराने संस्कृत पाठशाळा चालविली होती. काही कामानिमित्त कविश्रेष्ठ गुरुदेव रवींद्रनाथ टागोर त्या गावी आले होते. जमीनदाराला हे कळल्यावर आपली धर्मनिष्ठा दाखवावी, म्हणून त्याने रवींद्रनाथांना पाठशाळेला भेट देण्याची विनंती केली. रवींद्रनाथांचा संस्कृतवाङ्मयाचा अभ्यास मोठा सखोल होता व त्याविषयी त्यांना फार प्रेमही होते. एवढ्या छोट्या गावात संस्कृत पाठशाळा चालविली आहे, याचे त्यांना फार कौतुक वाटले. ते आवर्जून पाठशाळा पाहण्यास गेले. निरनिराळे वर्ग व त्यांमध्ये चालू असलेले अध्यापन त्यांनी आस्थेने पाहिले. अगदी सुरुवातीच्या वर्गात मुलांना संस्कृत भाषेत प्रवेशासाठी रघुवंशाचा दुसरा सर्ग शिकविला जात असल्याचे त्यांना कळून आले. ' रघुवंशाचा दुसरा सर्ग वाङ्मयीन दृष्ट्या फार उत्तम आहे. त्यातील आशयही फार चांगला चिरंतन असा आहे. पण एकूण रचना आणि तो आशय लहान मुलांना पेलणारा नाही. त्यापेक्षा पहिला सर्ग सोपा, वृत्तही छोटे, तसेच पञ्चतंत्र, हितोपदेशासारखे लहान मुलांना आकर्षक



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

वाङ्मय असता रघुवंशाचा दुसरा सर्गच प्रथम शिकवायला का निवडला?', असे शाळाचालकांना त्यांनी विचारले. 'ही परंपरा अनादी कालापासून चालूच आहे; तीच आम्ही चालवतो. शिवाय पहिल्या सर्गात दिलीप राजाला नन्दिनीचा शाप आहे व दुसऱ्या सर्गात त्याला पुत्रप्राप्तीचा वर मिळाला आहे. प्रारंभी मंगल घटना असावी, म्हणून दुसरा सर्ग शिकविण्याची परंपरा सुरू झाली आहे.' असे चालकांनी त्यांना सुनावले.

भेटीचा कार्यक्रम संपायच्या वेळेला त्या जमीनदाराने अभिप्रायासाठी अभिप्राय-पुस्तक त्यांच्यापुढे केले. त्यांनी औपचारिक समाधान प्रथम लिहून नंतर पुढीलं स्पष्ट परखड अभिप्राय लिहिला.

'रघुवंशाचा दुसरा सर्ग संस्कृत भाषेत प्रवेशासाठी शिकविणे म्हणजे दाढी करण्यासाठी कुऱ्हाड वापरण्यासारखे वाटते. कालिदासाने रघुवंश हे सुंदर काव्य पाठ्यपुस्तक म्हणून रचलेले नाही. तर प्रौढ व्यक्तींना रसास्वाद आणि त्याचबरोबर काही संदेश देण्यासाठी त्याची रचना केलेली आहे.'

पण हे वास्तवाचे भान अनादी सनातन परंपरावाद्यांनी ठेवले नाही. त्यामुळे काळाच्या प्रचंड आगीत वाळक्याबरोबर ओलेही जळून खाक झाले. केवळ सांगाडा सांभाळण्यात खोटे समाधान मानणाऱ्यांनी आत्माच हरवला. अशी ही प्राचीन भारतीय शिक्षण-पद्धतीची शोकांतिका आहे.

**भूषण, २/२, मनोज सहनिवास, मार्केट यार्ड रस्ता, पुणे ४११ ०३७.**

■ ■

**ओलीस**

अलीकडे दहशतवाद इतका वाढला आहे की त्यामुळे ओलीस ठेवलेल्यांचे वृत्त आपल्याला जवळपास रोज वाचायला मिळते. पण या शब्दाचा योग्य उपयोग आज कोणालाच माहीत नाही असे दिसते.

मूळ शब्द आहे 'ओल'. 'ओलीस' त्याचे चतुर्थ्यन्त रूप आहे. दाते यांच्या महाराष्ट्र शब्दकोशातील पुढील नोंद पाहा :

ओल - स्त्री. हमीदाखल ठेवलेली वस्तू (गुरे, माणसे इ.) तारण; शत्रूने तहाच्या अटी पाळाव्यात म्हणून त्याच्याकडून खातरजमेसाठी मनुष्य, गुरे, द्रव्य इ. मागून घेऊन त्यांस अटी पूर्ण होईपर्यंत अडकवून ठेवणे. 'कोट किल्ले दिले ओलिला त्रिंबकजीसाठी - ऐपो ३८३.

□

**('आजचा सुधारक' जाने. १९९४ मधून सौजन्याने)**



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# सिद्धानुवाद - अनुभवामृत

गोपाळ नीळकंठ दांडेकर

*(पूर्वसंदर्भ : कवी विंदा करंदीकर यांनी ज्ञानेश्वरांच्या 'अनुभवामृत'चा पुराण मराठीतून अर्वाचीन मराठीत अनुवाद पुस्तकरूपाने प्रकाशित केला. ('संत ज्ञानेश्वरांचा अमृतानुभव' : ज्ञानदेवरचित अनुभवामृताचे विंदाकृत अर्वाचीनीकरण, मुंबई, मौज, जुलै १९८१) त्यातल्या सुरुवातीच्या भागाचे पूर्वप्रकाशन 'मौज' वार्षिकातून (दिवाळी १९७६) झाले. त्याचा परामर्श घेणारा हा लेख 'सत्यकथा' मध्ये (मे १९७७) प्रकाशित झाला. या लेखामुळे अर्वाचीनीकरणाकडून करायच्या अपेक्षा आणि तत्त्वज्ञान-काव्याच्या अनुवादाकडून करायच्या अपेक्षा यांबद्दल महत्त्वाचे प्रश्न उपस्थित होतात. त्यांचा अधिक विचार पुढे व्हायला पाहिजे.) (लेखाचे लेखन यथामूल ठेवले आहे.)*

मौजेच्या या वर्षीच्या दिवाळी अंकामध्यें 'ज्ञानेश्वर विरचित अनुभवामृताचें विंदाकृत अर्वाचीनीकरण' या शीर्षकाखालीं 'संत ज्ञानेश्वरांचा अमृतानुभव' या नांवाचा अनुभवामृताच्या पहिल्या प्रकरणाचा ओवीमय अनुवाद प्रकाशित झाला आहे.

अनुभवामृताचा प्रारंभ पाच संस्कृत श्लोकांनीं झाला असून, पुढें ओव्या रचलेल्या आहेत. या संस्कृत श्लोकांचेंही विंदांनीं मराठी ओव्यांमध्यें अर्वाचीनीकरण केलें आहे.

ज्ञानेश्वरीची रचना गीतेच्या श्लोकांस अनुसरून झाली असल्यानें तिथें संगती आणि अर्थही लावणें एका अर्थी सोपें जातें. अनुभवामृत हा सिद्धांत ग्रंथ आहे. ज्ञानदेवांच्या भाषेंत बोलायचें, तर तो सिद्धानुवाद आहे. सिद्धमताचा अनुवाद असल्यामुळें त्याचा विषय ध्यानीं येणें केवळ यत्नसाध्यच आहे.

आतांपर्यंत अनुभवामृताचा अनुवाद करण्याचे अनेक प्रयत्न झाले. वै. गु. विष्णुबोआ जोग, ह. भ. विनायकबोआ साखरे, वै. प्रल्हादबुवा सुबंध, इत्यादी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

भागवतांचे प्रयत्न विशेष लक्षणीय होते. वै. पांडुरंगशर्मा चऱ्होलीकर यांनीं अनुभवामृताची संगती लावायचा अभिनव आणि धाडसी मार्ग दाखवून दिला. हे सर्व अनुवाद गद्यानुवाद होते.

या ग्रंथाचा पद्यानुवाद करण्याचेही काही प्रयोग झाले. मात्र समओवी - एका ओवीस एकच ओवी, असा प्रयत्न फारसा झाला नसावा.

अनुभवामृत ग्रंथ सैल बांधणीचा नव्हे. इतरत्रही ज्ञानदेव मोकळें चाकळें बोलत नाहींत, बांधीव शब्दरचना करतात.

साच आणि मवाळ । मितुले आणि रसाळ

अशी त्यांनीं केलेली शब्दकल्लोळांची व्याख्या त्यांच्या भाषेस तंतोतंत लागू पडते. इथें तर प्रत्येक शब्दाची योजना अर्थगर्भ आहे. तेव्हां अनुवादकर्त्यांनींही शब्दयोजनेकडे अधिकाधिक लक्ष पुरविलें पाहिजे. सुटा, सैल, मोकळा डगळ अंगाचा, अतिव्याप्त किंवा अव्याप्त शब्द वापरतां नये. ज्ञानदेवांस जो आणि जितका अर्थ अभिप्रेत असेल, तोच आणि तेवढाच सामावेल, असा प्रतिशब्द अर्वाचीनीकरणकारानें योजला पाहिजे.

विंदांनीं ज्ञानदेवांच्या ग्रंथास अमृतानुभव म्हटलें आहे. पण शीर्षभागीं असलेल्या - बहुधा संपादकीय - टिपेमध्यें ग्रंथाचें नांव अनुभवामृत दिलें आहे, आणि ज्ञानदेवांस अनुसरूं जातां तेंच यथायोग्य आहे. ग्रंथाच्या दहाव्या प्रकरणामध्यें अनुक्रमें १९, २०, २४, २५ आणि ३१ अश्या पांच ओव्यांमध्यें ज्ञानदेव हा ग्रंथ अनुभवामृत असल्याचें आदेखून सांगत आहेत.

या ग्रंथांतील सिद्धांत हा ज्ञानदेवांनीं स्वत: अनुभवला आहे. आत्मानुभवावर, आत्मप्रतीतीवर ज्ञानदेवांची निरतिशय श्रद्धा आहे. कोणतेंही तत्त्व जोंपर्यंत स्वत:ला प्रतीत होत नाहीं, तोंपर्यंत तें कुणीही सांगितलेलें असो, ज्ञानदेव तें यथार्थ मानीत नाहींत. उदाहरणार्थ, ज्ञान एका मर्यादेपलीकडे बंधनकारक आहे, असें गीताकार श्रीकृष्ण आणि ज्ञानदेवांचे आदिगुरू श्रीमहादेव, दोघांचेंही मत आहे. मात्र ज्ञानदेव म्हणतात -

परि शिवें की श्रीवल्लभें । बोळिलें येणेंचि लोभें ।
मानूं, तेंही लाभे । न बोलतांही ॥ ३.१८

'या दोन्ही श्रेष्ठांनीं ज्ञानास बंधनकारक म्हटलें नसते, तरी आम्ही म्हटलें असते, कारण तो आमचा अनुभव आहे.'

अश्या या स्वानुभूतीचें अमृत ज्ञानदेवांनीं अनुभवामृताच्या मिसानें संतसज्जनांसमोर वाढलें आहे.

ययालागीं हें बोलणें । अनुभवामृतपणें ।
स्वानुभूति परगुणें । वोगरिलें ॥ १०.२४



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

तेव्हां ज्ञानदेवांच्या मतें ग्रंथाचें नांव अनुभवामृत, 'अमृतानुभव' नव्हे.

कांहीं थोडके स्पष्टीकरणही इथेंच केलें पाहिजे. अनुभवामृत हा सिद्धानुवाद आहे. म्हणजे सिद्ध जें ब्रह्म, त्याचा अनुवाद नव्हे, (कांहीं अनुवादकर्त्यांनीं तसा अर्थ केला आहे,) तर सिद्ध, जे ज्ञानदेवांचे आचार्य, त्यांच्या मतांचा अनुवाद. ज्ञानदेव म्हणतात :

आदिनाथ गुरु सकळ सिद्धांचा
मत्स्येन्द्र तयाचा, मुख्य शिष्य ॥
मत्स्येन्द्रानें बोध गोरक्षासी केला
गोरक्ष वोळला गहिनीप्रती ॥
गहिनीप्रसादें निवृत्ति दातार
ज्ञानदेवा सार चोजविलें ॥

असे जे सिद्ध, त्यांच्या तत्त्वज्ञानाचें विवरण, म्हणजे ज्ञानदेवांनीं स्वत: अनुभविलेलें रसायन, हें अनुभवामृत. आदिनाथांपासून निवृत्तिनाथांपर्यंत ही जी सिद्धपरंपरा चालत आली, तिच्या सिद्धांताचे मराठी भाषेंत विवरण करणारा अनुभवामृत हा सर्वोत्तम ग्रंथ आहे. या शैव तत्त्वज्ञानाच्या मुळाच्या शोधासाठीं कश्मीरी शैव सिद्धांत किंवा पांचरात्र तत्त्वज्ञान यांच्या दारीं जायची मुळींच गरज नाहीं.

ज्ञानदेव या तत्त्वज्ञानास औपनिषद् तत्त्वज्ञान म्हणतात.

एवं दशोपनिषदें । पुढारां न ढळतीं पदें ।
देखोनि कुडी बोधें । येथेंचि दिधली ॥ १०.१८

या औपनिषद् तत्त्वज्ञानाचा सिद्धांच्या तेजोमयी प्रज्ञेनें पाहिलेला हा अर्थ आहे. यापरतें संविद्रहस्य कांहीं नाहीं, अशी ज्ञानदेवांची प्रतिज्ञा आहे.

ज्ञानदेव द्वैती, कीं अद्वैती, असेही वाद अनेकदां ऐकू येतात. द्वैती-अद्वैती अश्या सांकेतिक चौकटी कल्पून त्यांमध्यें ज्ञानदेवांस कोंबून बसवण्यांत अर्थ नाही. त्यांना कांहीं एक नांवच द्यायचा आग्रह असेल, तर अद्वयी म्हणावें. कारण आपण शांभव अद्वयानंदवैभवाचा अनुवाद करीत आहोंत, अशी घोषणा त्यांनीं केली आहे. अद्वैत शब्दाचें त्यांस वावडें मात्र नाहीं. शिवशक्तीच्या ऐक्याच्या संदर्भामध्यें त्यांनी तोही शब्द वापरला आहे.

अनुभवामृताचे पहिले पांच संस्कृत श्लोक सूत्ररूप आहेत, तशीच पहिली ओवीही सूत्रबद्ध आहे. शेष सर्व ग्रंथ या सूत्रांचें विवरण, विस्तार आहे.

यांतील प्रत्येक शब्द आणि त्याचा क्रम हेतुपूर्वक योजिलेला आहे. त्या क्रमालाही विशिष्ट अर्थ आहे. वाटेल तो शब्द वाटेल तिथें ठेवून चालणार नाहीं. या प्रत्येक शब्दाचा आशय कांटेकोर आहे. तो ध्यानीं येण्यासाठीं ज्ञानेश्वरशरण झालें पाहिजे. बुद्धी स्वैरिणी होऊं देतां कामा नये. तरच अनुभवामृताचें मर्म ध्यानीं



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

येण्याची शक्यता.

कोणत्याही शब्दाचा वापर करतेवेळीं तत्त्वज्ञाच्या मनीं त्या शब्दाचा विशिष्ट पारिभाषिक अर्थ अभिप्रेत असतो. उदाहरणार्थ, माया हा शब्द. या शब्दाचा वैदिक अर्थ शक्ती असा आहे. इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते । 'इन्द्र आपल्या शक्तींनीं नानारूपांचा होतो.' मात्र श्रीशंकराचार्य तो निराळ्या अर्थानें वापरतात. सदसद्‌विलक्षण, अनिर्वचनीय आणि सान्त असें त्यांनीं मायेचें लक्षण केलें आहे. पूर्वसूरींनीं एकदां वापरलेला कोणी एक शब्द त्याच पारिभाषिक अर्थानें वापरला पाहिजे, असें बंधन द्रष्टच्या तत्त्वज्ञांवर कुणीं घालूं नये. ज्ञानदेवांचेही मनीं शब्दांची एक अर्थसरणी स्फुरलेली असते. मागील-पुढील संदर्भ ध्यानीं घेऊन त्या शब्दासाठीं प्रतिशब्द योजिला पाहिजे.

ज्ञानेश्वरीच्या विवरणाचे वेळीं ज्ञानदेवांस जसा श्रीव्यासांचा मागोवा घ्यावा लागला, तशीच, जे इतर श्रेष्ठ भाष्यकार, त्यांसही वाट पुसावी लागली. राजवाडे प्रतींतली प्रस्तुत ओवी येणेंप्रमाणें -

तैसा व्यासाचा मागोवा घेतु ।
भाष्यकारांतें वाट पुसतु ।

व्यास शब्द एकवचनी आहे, तर एकाहून अधिक भाष्यकार असल्यामुळें तो शब्द बहुवचनी. ज्ञानदेवांनीं गीतेचा अर्थ कित्येक ठिकाणीं शंकराचार्यांस अनुसरून, कांहीं स्थळीं रामानुजांस तर कित्येक स्थळीं स्वतःला भावला, तसा केला आहे.

मात्र अनुभवामृतांतील शांकरी विद्येशीं शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा अणुमात्र संबंध नाहीं. श्रीमहादेवांपासून ज्ञानदेवांपर्यंत चालत आलेला हा सिद्धसिद्धांत आहे.

अशा या सर्वतंत्र स्वतंत्र अनुभवामृताच्या विंदांनीं केलेल्या अर्वाचीनीकरणाचें स्वागत करीत असतां वरील सर्व आशय ध्यानीं ठेवून, त्याचे परीक्षण करावयास हवें. विंदाकृत प्रयत्नांपैकीं पहिल्या श्लोकासाठीं त्यांनीं लिहिलेली मराठी ओवी आणि पहिल्या ओवीची समओवी, यांची चिकित्सा इथें केली आहे.

ज्ञानदेवांचा प्रथम श्लोक येणेंप्रमाणें :

यदक्षरमनाख्येयमानंदजमव्ययम्
श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये ॥

या श्लोकाचें विंदाकृत अर्वाचीनीकरण असें -

जें अविकारी, अवर्णनीय
अनादि, अविनाशी, आनंदमय
त्या दैवताचा करतों आश्रय
श्रीनिवृत्तिनाथ नांवाच्या ॥ १ ॥

ज्ञानदेवांनीं श्रीनिवृत्तिनाथांसाठीं अनुक्रमें अक्षर, अनाख्येय, आनन्द, अज आणि अव्यय अशीं विशेषणें योजिलीं आहेत. ओळींतील यमकाच्या सोयीसाठीं



मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

विंदांनीं ज्ञानदेवांचा क्रम बदलला आहे. त्यांनीं त्या त्या विशेषणासाठीं शब्द वापरले, ते असे -

अक्षर - अविकारी
अनाख्येय - अवर्णनीय
आनंद - आनंदमय
अज - अनादि
अव्यय - अविनाशी

ज्ञानदेवाच्या एकेका विशेषणाचा लक्ष्यार्थ तूर्तास एक्या अंगास सारू. अगदी लौकिक अर्थानेंही वाच्यार्थ येणेंप्रमाणें -

क्षर शब्दाचा अर्थ आपटयांच्या कोशामध्यें Melting away. वितळणारें, असा दिला आहे. melt धातूचा अर्थ ऑक्सफोर्ड कोशात to vanish नाहींसा होणें, असा सांगितला आहे. क्षर म्हणजे नाहींसा होणें. क्षर शब्दाचें मराठी रूपांतर झरणें. अक्षर शब्दाचा अर्थ, न झरणारें, न वितळणारे, नाहीसें न होणारें असा होतो. ज्याचें स्वरूप स्थिर, अविचल आहे, तें अक्षर. या विशेषणासाठीं विंदांनीं अविकारी हा शब्द वापरला आहे. विकार शब्दाचा अर्थ change of form of nature रूपामध्यें बदल होणें असा आपटे करतात. रूपांतर होणें, म्हणजे झरणें, उणावणें, नष्ट होणें नव्हे. षड्विकारांपैकीं वर्धते, हा विकार तर अगदीं विरुद्ध अर्थाचा आहे. तेव्हां अक्षर शब्दासाठीं अविकारी हा शब्द मुळींच युक्त नाहीं.

दुसरें विशेषण अनाख्येय. जें आख्येय नाहीं, तें अनाख्येय. आख्येय म्हणजे fit to be told सांगण्यास योग्य असें. ज्याचेविषयीं कांहीं सांगणें शक्य योग्य नाहीं, ते अनाख्येय. अनाख्येयसाठीं विंदांनीं अवर्णनीय शब्द उपयोजिला आहे. वर्ण म्हणजे to explain, सविस्तर सांगणें. अवर्णनीय म्हणजे ज्याचेविषयीं विस्तारपूर्वक सांगतां येत नाहीं, असें. अनाख्येयसाठी अवर्णनीय हा प्रतिशब्द 'चालशे' या जातीचा असला, तरी तो नेटका समर्पक नव्हे.

आनंदचा आनंदमय हा प्रतिशब्द तर केवळ अनर्थकारक, आनन्दरूपास शबल करणारा आहे. मय प्रत्ययाचा अर्थ an affix used to indicate 'made of' 'चा केलेला' असा आहे. जसा घट मृत्तिकेचा केलेला. पट तंतूंचा केलेला. मृत्तिका आणि तंतू हीं अनुक्रमें घट आणि पट या दोन्हींचीं उपादानकारणें आहेत. आनंद हे निवृत्तिनाथांचें उपादानकारण? छे छे! यापरता दुसरा अनर्थ कुठलाही नव्हे. आनंद हें ज्यांचें अस्तित्व, त्याला 'आनंदाचा केलेला' म्हणणें, म्हणजे त्याची पदावनति करणें आहे.

ज्ञानदेवांनीं वापरलेलें पुढील विशेषण अज. ज्याच्या बाबतींत जन्म ही कल्पना संभवत नाहीं, असें. जन्म संकल्पनेंत मायबापें गृहीत धरलीं आहेत. ज्याचे बाबतींत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

त्यांचा विचार निर्माण होत नाहीं, तें अज. या शब्दाचें आधुनिकीकरण विंदांनीं अनादि असें केलें आहे. ज्याला आदि, प्रारंभ नाहीं, तें अनादि. ज्याचा जन्म संभवत नाहीं, त्यासाठीं निरुपायानें अनादि असा क्षीण पर्याय योजावा, पण तो क्षीण आहे, तंतोतंत नव्हे.

शेवटीं त्या निवृत्तिनाथ दैवतास ज्ञानदेव अव्यय असें गौरवितात. ज्याचा व्यय, वेच संभवत नाहीं, तें अव्यय. अविनाशी म्हणजे 'नाश होत नाहीं तें.' या शब्दानें 'संपूर्ण नाश न होणें' सूचित होतें. 'व्यय न होणें' सूचित होत नाहीं. तेव्हां अव्ययचा नेटका प्रतिशब्द अविनाशी नव्हे.

एवंच अक्षर, अनाख्येय, आनंद, अज आणि अव्यय या पांचही विशेषणांचें विंदांनी केलेले अर्वाचीनीकरण गोळाबेरीज, जेमतेम आहे, तंतोतंत नव्हे.

पहिल्या ओवीच्या प्रतिओवींमध्येही असाच घोळ आहे. मूळ ओळी अशी-

ऐसीं इयें निरुपाधिकें
जगाचीं जियें जनकें
तियें वंदिलीं मियां मुळिकें
देवादेवी ॥

हिचें विंदाकृत अर्वाचीनकरण असें -

अशीं उपाधिरहित
जीं जगाचीं मायतात
तीं म्यां वंदिलीं मूलभूत
शिवशक्ति ॥

मूळ ओळीचें ओज आणि आकर्षण या अर्वाचीनीकरणामध्यें मुळींच उतरलें नाहीं. तें अगदीच सपक झालें आहे.

विंदांनीं एक अतिशय महत्त्वाचा शब्द गाळला आहे. बहुधा त्यांना त्याचें महत्त्व जाणवलें नसावें. 'इयें' हे सर्वनाम ज्ञानदेवांनीं फार योजनापूर्वक वापरलें आहे. तें वगळणें, हें 'अयमात्मा ब्रह्म' या महावाक्यातील 'अयम्' शब्द गाळण्यासारखे दोषास्पद आहे. ज्ञानदेव प्रारंभीं देवोदेवींना इयें म्हणतात. इयें म्हणजे हीं अगदी जवळ असलेली. किती जवळ? तर अहं देउनी शंभुशांभवी होतां यावें - अगदीं सहज, इतकीं जवळ, समीपतरवर्ती. इदमस्तु संनिकृष्टं रूपम् अगदी जवळ जें, त्यासाठीं इदम्, 'हें', हें सर्वनाम वापरावें, असा संकेत आहे. याच ओवींतील तृतीय चरणामध्यें तियें हेंही सर्वनाम देवोदेवीसाठीं वापरून ज्ञानदेवांनीं हें समपीवर्ती आणि तें दूरवर्ती, दोहींतील भेद नाहींसा केला आहे. तेंव्हा या जोडीपैकी इयें, हे सर्वनाम गाळणें हा घनघोर प्रमाद आहे.

उपाधिरहित या शब्दाद्वारें विंदांस काय सुचवायचें आहे, तें त्यांसच ठावें.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

कदाचित् ज्यांना कोणतीही उपाधी संभवत नाहीं, अशी उपाधीवेगळीं, असा अर्थ विंदांचे मनीं असावा. ज्ञानदेवांस मात्र निरुपाधिकें शब्द वापरीत असतां या देवोदेवींस (जगाएवढें बाळ विऊनही) एकमेकांचीही उपाधि होत नाहीं, असें म्हणायचें आहे. बहुधा सर्वच भाषांतरकारांस हा अर्थ मान्य आहे.

पुढे ज्ञानदेव या दोघांस जगाचीं जनकें म्हणतात. जनकें म्हणजे दोघांमध्येही न्यूनाधिक भाव मुळींच नाहीं. मायतात या शब्दांमध्यें काहीं थोडके उणेंदुणेंपण येतेंच. तात हा केवळ बीजारोपक. शेष धारणादी सर्व मायला करावें लागते. हें सांख्यांच्या प्रकृति-पुरुषांसारखें झालें. सांख्यांचा प्रकृतिपुरुषभाव जसाच्या तसा ज्ञानदेवांनीं स्वीकारला नाहीं. त्यांचीं हीं जनकें दोघेही जगाएवढें बाळ वियालीं आहेत, न्यूनाधिक्य मुळींच नाही.

हेंच शेवटील देवोदेवी शब्दानें ज्ञानदेवांस सुचवायचें आहे. देव शब्दांतील मूळ धातू दिव्, प्रकाशणें असा आहे. दोघेही दीप्तिमान आहेत. देव प्रकाशमय, देवीही प्रकाशमयी. या दोघांमधील हें साधर्म्य व्यक्त करण्यासाठींच ज्ञानदेवांनीं 'देवोदेवी' असा जोडशब्द वापरला आहे. शिवशक्ती या शब्दामधून हें साधर्म्य सूचित होत नाहीं. इथें अर्वाचीनीकरण अगदींच लंगडें झालें आहे.

पहिला श्लोक आणि पहिली, अतिशय महत्त्वाची ओवी, यांच्या अर्वाचीनीकरणावरील हे अल्पाक्षर परीक्षण संपवीत असतां जातां-जातां सहाव्या ओवींतील एका शब्दाकडेही लक्ष वेधणें अगत्याचें आहे. मूळ ओवी अशी :

हा ठावोवरी वियोगभेडें
जे बाळ जगाएवढें
वियाली परी न मोडे
दोघुलेपण ॥

विंदांचे अर्वाचीनीकरण असें -

वियोगभय इतकें बडें
जरी प्रसवलीं जगाएवढें
बाळ, तरीही त्यांची न मोडे
जोडिगोडी ॥

पैकीं केवळ यमकाच्या सोईसाठीं बडें हा हिंदी शब्द विंदांनीं वापरला खरा. पण मूळ ओवींत त्या अर्थाचा शब्द मुळींच नाहीं. हा हिंदी शब्द वापरून आपण भाषासंकर करीत आहोंत, हें एकतर विंदांच्या ध्यानीं आलें नसावें, किंवा असा हा भाषासंकर हा अर्वाचीनीकरणाचा एक भाग असावा.

शेवटीं नम्रतापूर्वक सांगायचें तें हें, कीं ज्ञानदेवांसारख्या भाषाप्रभू तत्त्ववेत्त्याच्या सिद्धांतग्रंथांचें अर्वाचीनीकरण करताना अधिक दक्षता घ्यायला हवी. कवीचा परवाना



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

या बाबतींत वापरून कसे चालेल?

वयाच्या सतराव्या वर्षी ज्ञानदेवांच्या वाङ्मयाशीं परिचित होण्याचें भाग्य मला लाभलें. तिथपासून एव्हांपर्यंत ज्ञानदेव जसे मला उमगले, तसे मांडायचा प्रयत्न मी या लेखामध्यें केला आहे.

*(अनुभवामृताच्या पहिल्या ओवींतील 'निरुपाधिक' या विशेषणासंबंधानें ह. भ. प. विष्णु नरसिंह जोग यांनीं सांगितलेल्या सुबोध महाराष्ट्र अर्थविवरणांत काय सांगितलें आहे, तें सोयीसाठीं इथे उद्धृत केलें आहे. (निर्णयसागर आवृत्ती, शके १८२७) -*

*"... देवोदेवी (पुरुष व प्रकृती) उपाधिरहित आहेत. येथें कोणाला अशी शंका येईल कीं, वेदांतशास्त्रकारानें प्रकृती ही पुरुषाची उपाधी आहे, असें सांगितलें आहे. तर मग प्रकृतिपुरुष ही निरुपाधिक होतील कशीं? याचें समाधान असें आहे कीं... परब्रह्म आपण नित्य आहे... त्याच्या नित्य स्थितीलाच सत् संज्ञा आहे. त्या सत् स्वरूपास पुरुष म्हणतात. आता ह्या पुरुषभावामध्ये 'एकोऽहं बहुस्यां' असें जें स्फुरण उठलें, त्यासच प्रकृती म्हणतात. 'केवळ जे सत्ता! तो पुरुष पंडुसुता! आणि प्रकृति ही समस्ता! क्रियानाम' (ज्ञा. अ. १३, श्लोक १९, ओ. १६६)... स्फुरणरूप प्रकृति पुरुषाहून भिन्न नसून ती तद्रूप आहे... त्यांच्या स्वरूपऐक्याभावाच्या ठिकाणीं भिन्न अशी कांहीं उपाधीं नसल्यामुळें ती निरुपाधिकें आहेत... दुसरी अशी शंका येते, की... प्रकृति पुरुष निरुपाधिक (असतां)... जगत् उपाधीला तीं कारणीभूत कशीं होतील?... प्रकृतीचा परिणाम... जगत्... प्रकृतिपुरुषात्मक वस्तुरूप आहे... त्याअर्थी.... वेगळी जगत् उपाधि आहे, असें म्हणतां येणार नाहीं.")*

■ ■



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# संत ज्ञानेश्वरांचा अमृतानुभव विंदा करंदीकरांची प्रतिक्रिया :

विंदा करंदीकर

*(गो. नी. दांडेकर यांच्या परीक्षण-लेखावर 'सत्यकथा' मासिकातून (डिसेंबर १९७७) गो. वि. करंदीकर यांनी आपली प्रतिक्रिया नोंदवली. ती नंतर त्यांच्या अर्वाचीनीकरणाच्या दुसऱ्या आवृत्तीमध्ये (मुंबई, मौज, फेब्रुवारी १९९६) परिशिष्ट १ म्हणून पुनर्मुद्रित केलेली आहे. वाचकांनी मूळ लेख व ही प्रतिक्रिया पाठोपाठ वाचावी)*

'सत्यकथे'च्या मे १९७७ च्या अंकामध्ये श्री. गो. नी. दांडेकर यांनी 'मौजे'च्या १९७६ सालच्या दिवाळी अंकामध्ये प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'अनुभवामृता'च्या अर्वाचीनीकरणाच्या पहिल्या प्रकरणाची स्वागतपूर्वक दखल घेतली आणि एका अनधिकारी माणसाने केलेला एक अव्यापारेषु व्यापार असे समजून त्याच्याकडे दुर्लक्ष न करता त्यातील दोन-तीन ओव्यांवरील आपला अभिप्राय स्पष्टपणे व्यक्त केला. त्यांच्यासारख्या सुप्रसिद्ध लेखकाने आपला दृष्टिकोन व आपले आक्षेप स्पष्टपणे मांडणे ही गोष्ट माझ्या प्रयत्नाला पूरक अशीच आहे. त्याबद्दल मी त्यांचे आभार मानतो. पण त्यांच्या स्थूल दृष्टिकोनातील काही भाग शोधक विचाराला बाधक ठरणारा, त्यांचा ठामपणा अमृतानुभवातील काही प्रश्नांकडे दुर्लक्ष करणारा व त्यांचे बरेचसे आक्षेप अर्वाचीनीकरणातील अंगभूत अडचणी लक्षात न घेणारे आहेत, असे मला वाटले. मला असे का वाटले, हे स्पष्ट होण्यासाठी प्रथम माझा स्थूल दृष्टिकोन मांडतो व नंतर त्यांच्या आक्षेपातील तपशिलाकडे वळतो.

ज्ञानेश्वरांचे वाङ्मय समजून घेताना 'निखळ महाराष्ट्रीय' किंवा 'व्यापक जागतिक' हे दोन्ही संदर्भ मला अनुक्रमे संकुचित व अप्रस्तुत वाटतात. भारतीय परंपरेच्या संदर्भातील एक काही स्वतंत्र विचार असलेला तत्त्वज्ञ, एक मोठा कवी, आणि तत्त्वज्ञान व काव्य यांचा एकजिनसीपणाने प्रत्यय घेणारा एक चैतन्यशील माणूस म्हणून मी ज्ञानेश्वरांकडे पाहतो. त्यांचा अमृतानुभव हे एक असामान्य व



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

वैशिष्ट्यपूर्ण तत्त्वकाव्य आहे आणि काही विशिष्ट भागात अशा तत्त्वकाव्याच्या आवाक्यात येणारी उत्कटता त्याने गाठलेली आहे. असा एखादा महत्त्वाचा ग्रंथ जुन्या अनाकलनीय भाषेमुळे वाचकापासून दुरावू लागला की माझ्यासारख्या माणसाला त्याच्या अनुरूप अर्वाचीनीकरणाची आवश्यकता जाणवू लागते; आणि ते करताना, आकलनासाठी लागणाऱ्या समीक्षावृत्तीचा पुनर्रचनेसाठी लागणाऱ्या सर्जक वृत्तीशी मेळ घालावा लागतो.

जुन्या मराठी संतकाव्याचा खास अभ्यास नसलेल्या माझ्यासारख्या अनधिकारी माणसाला अमृतानुभवातील भाषेचे व आशयाचे आकलन होणे कठीण आहे, याची मला कल्पना आहे. मी 'आशयाचे' असे म्हटले, 'वाच्यार्थाचे' असे नव्हे, कारण अशा सर्जनशील तत्त्वकाव्यात वाच्यार्थ कुठे संपतो आणि लक्षणा किंवा व्यंजना कुठे सुरू होतात, ते, खरे म्हणजे, मला कळत नाही. भाषेच्या सर्जनशील उपयोगात हे पंडिती भेद पुसट होत असावेत. मला जाणवतो, तो परस्परांत गुंतलेल्या अर्थशाखांचा एक जिवंत व वर्धिष्णू वृक्ष. अशा आशयाच्या आकलनासाठी शब्दांना एकाच वेळी अनेक बाजूंनी भिडावे लागते. व्युत्पत्ती ही काही वेळा सूचक ठरत असली, तरी निर्णायक नसते. म्हणून अमृतानुभवातील ओवीला भिडताना मी कोशातील अर्थाबरोबरच परंपरेला जपणाऱ्या शिवकल्याण, जोग, साखरे, सुबंध, गोखले, पाठक, बहिरट, वगैरे सांप्रदायिकांनी दिलेले अर्थ व केलेली भाष्ये जमेला घेतो आणि विविध पाठभेदांचा तौलनिक विचार करताना निष्पन्न होणारा अर्थ अमृतानुभवाच्या केंद्रीय विचाराशी, लगतच्या संदर्भाशी व आसपासच्या शब्दसारणीशी कितपत मिळताजुळता आहे, हे पाहणे महत्त्वाचे मानतो. या प्रयत्नातून हाती लागणारा आशय अर्वाचीनीकरणाच्या मुख्य प्रवाहात उतरविणे व सयुक्तिक वाटणारे इतर महत्त्वाचे अर्थभेद - मग ते पाठभेदाने झालेले असोत, की भाष्यभेदाने झालेले असोत, पर्यायांमध्ये अंतर्भूत करणे हे माझ्या प्रयत्नाचे लक्ष्य राहते. गोखल्यांनी उपलब्ध केलेली संहिता मी सामान्यतः अनुसरीत असलो, तरी काही वेळा त्यांना सोडून इतरांना अनुसरण्याचा प्रसंग निरनिराळ्या कारणांमुळे येतो. (सर्वमान्य अशी संहिता अजून उपलब्ध नाही आणि पाठभेद विपुल आहेत.) पण महत्त्वाचे असे काही गळू नये व माझे असे काही मिळू नये, हे धोरण राहते.

अमृतानुभवाचे अर्वाचीनीकरण करताना मुळातील विचाराला व काव्याला काटेकोरपणे जपण्याची इच्छा व प्रयत्न असला, तरी प्रत्येक ठिकाणी ते शक्य असतेच, असे नाही. अर्वाचीनीकरणाच्या कल्पनेतच काही तडजोडी अंतर्भूत असतात. वरवर पाहणाऱ्याला ओवी हा,यमकाचे बंधन सोडल्यास, विमुक्त असा रचनाप्रकार वाटेल. पण ओवी काय किंवा मुक्तछंद काय, स्थूल अर्थाने विमुक्त आहेत,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

असे भासले, तरी सूक्ष्मपणाने आपला अंतर्गत कायदा साकार करीत जातात. जुन्या शब्दांसाठी अर्वाचीन शब्द वापरले, की या कायद्यातही आपोआपच एक स्थित्यंतर घडून येते, यावे लागते. ते स्पष्टपणे सांगता येण्यासारखे नसते. या अंतर्गत लयीच्या निकडीने, अर्वाचीन भाषेच्या वेगळ्या चलनाच्या निकडीने, किंवा यमकाच्या निकडीने काही वेळा एखाद्या काटेकोर शब्दाऐवजी त्याच स्थूल अर्थाचा वेगळा शब्द निवडावा लागतो; त्यामुळे अर्थच्छटा हरवण्याची शक्यता असते. वरील तीन प्रकारच्या निकडींत अर्वाचीन भाषेतील दूरान्वयाच्या म्हणजे शब्द सोयीप्रमाणे दूर नेण्याच्या-मर्यादित शक्यता मिळवल्या, म्हणजे ज्ञानेश्वरांचा शब्दक्रम अर्वाचीनीकरणात टिकवणे किती कठीण आहे व काही ठिकाणी ते कसे अशक्य आहे, हे लक्षात येईल. पण ज्ञानेश्वरांचा शब्दक्रम प्रत्येक ठिकाणी अर्थपूर्णच असतो, अशी भाबडी श्रद्धा मी बाळगीत नाही. मोठे कवीही काही ठिकाणी आपला शब्दक्रम यमकाच्या व लयीच्या सोयीने ठरवताना आढळतात; ज्ञानेश्वरही त्याला अपवाद नाहीत. पण सामान्यत: ज्ञानेश्वरांच्या भाषेचे चलन कोणत्याही चांगल्या कवीप्रमाणे अर्थानुसारी व भावसूचक असते; म्हणूनच अर्वाचीनीकरणातील अशा त्रुटींना त्या कल्पनेतील अंगभूत तडजोडी मानाव्या लागतात.

अमृतानुभवाचे आकलन करताना अर्थातच आपली स्वत:ची बैठक बाजूला ठेवून, त्यातील अनुभवाशी समरस होण्याचा प्रयत्न करणे आवश्यक असते, हे मी मुद्दाम सांगण्याची जरुरी नाही; कारण हे अमृतानुभवाच्या बाबीतच आवश्यक असते, असे नव्हे, तर प्रत्येक ग्रंथाच्या बाबतीतच आवश्यक असते. फरक एवढाच : एखाद्या भावविवश, शब्दवेल्हाळ, प्रदर्शनचतुर व किस्सेबाज ग्रंथाच्या बाबतीत ही समरसता फक्त कष्टसाध्य असते, तर अमृतानुभवासारख्या ग्रंथाच्या बाबतीत ती सहजशक्य असते; आणि त्या समरसतेचे श्रेय वाचकापेक्षा ग्रंथाकडेच अधिक जाते. आशय आत्मसात होण्यासाठी समरसतेची अपेक्षा कोणी केली, तर ते मला कळू शकते. पण दांडेकर त्यासाठी 'ज्ञानेश्वरशरण झाले पाहिजे' असे सांगतात! ते मला थोडे चमत्कारिक वाटते. ज्ञानेश्वरशरण झाल्याने कदाचित श्रद्धाभावानांच्या पदरी पुण्य पडेल किंवा संभावितांच्या पदरी प्रतिष्ठा पडेल पण आशय पदरी पडेल, की काय, याबद्दल मला शंका आहे. खरे म्हणजे, कुणाच्या मनात असली शरणाशरणतेची जळमटे शिल्लक उरली असली, तर ती अमृतानुभवासारख्या ग्रंथाच्या प्रभावाने सामान्यत: नाहीशी झाली पाहिजेत. अर्वाचीनीकरणकर्त्याने किंवा समीक्षकाने तर ज्ञानेश्वरांच्या चैतन्यशील व्यक्तिमत्त्वाबद्दल व प्रतिभेबद्दल योग्य तो आदर ठेवणे जितके आवश्यक, तितकेच ज्ञानेश्वरशरणता टाळणे हेही आवश्यक; आदर ठेवलेला नसेल, तर असलेला आशय दिसणार नाही आणि शरणता टाळलेली नसेल, तर नसलेला आशय दिसू लागेल! त्यांच्या मर्यादा व शक्तिस्थाने - काही वेळा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

ती परस्परावलंबी असतात - ही जाणवणे तर जवळजवळ अशक्य होऊन बसेल.

ज्ञानेश्वरांबद्दलच्या, अमृतानुभवाबद्दलच्या व अर्वाचीनीकरणाबद्दलच्या माझ्या या दृष्टिकोनात अधिक चिंतनाने, अभ्यासाने किंवा अनुभवाने चढउतार होण्याची शक्यता मी नाकारीत नाही; पण सध्याचा दृष्टिकोन हा असा आहे. माझा दृष्टिकोन सांगितल्यानंतर आता दांडेकरांनी घेतलेल्या आक्षेपांतील तपशिलांकडे वळतो.

१. 'अनुभवामृत' हे नावच 'अर्वाचीनीकरणकर्त्यांनि वापरावयास हवे होते' असे दांडेकरांचे म्हणणे 'ज्ञानदेव' संत ज्ञानेश्वर या नावाने 'भावार्थदीपिका' ज्ञानेश्वरी या नावाने व 'अनुभवामृत' अमृतानुभव या नावाने अर्वाचीनांना अधिक परिचित आहेत. तेव्हा 'ज्ञानदेवविरचित अनुभवामृत' हा उल्लेख प्रथम केल्यावर मग शीर्षक म्हणून 'संत ज्ञानेश्वरांचा अमृतानुभव' असे लिहिणे हे अर्वाचीनीकरणाच्या हेतूशी अधिक सुसंबद्ध व पुरेसे सुस्पष्ट आहे, असे मी समजतो.

२. 'अक्षरम्' व 'अव्ययम्' : या मुळातील संस्कृत शब्दांसाठी मी अनुक्रमे 'अविकारी' व 'अविनाशी' असे मराठी शब्द वापरले. दांडेकर 'क्षर' व 'व्यय' या धातूचे मूळचे अर्थ पाहतात आणि त्या अर्थच्छटा 'अक्षरम्' व 'अव्ययम्' या शब्दांच्या पदरी बांधतात. तात्त्विक विचाराच्या स्थूल संदर्भात व अमृतानुभवाच्या विशिष्ट संदर्भात या दोन शब्दांना येणारे ब्रह्मसूचक पण विशेषणप्राय रूढ अर्थ कोणते, हे पाहिले पाहिजे. आपटे 'अक्षर' शब्दाचा पहिला अर्थ 'imperishable' व दुसरा अर्थ 'unalterable' असा देतात; मोनिअर विलिअम्स 'imperishable' व 'unalterable' असे एकदमच देतो. आपटे 'अव्यय' शब्दाचे not liable to change व 'imperishable' असे दोन अर्थ देतात; मोनियर विल्यम्सही तेच करतो. म्हणजे 'अक्षर' व 'अव्यय' यांपैकी प्रत्येक शब्दाला 'अविनाशी' व 'अविकारी' हे दोन्ही अर्थ आहेत. पण ज्ञानेश्वर एकाच ओळीत एकाच वस्तूबद्दल बोलत असताना एकाच अर्थाने दोन शब्द वापरतील, ही गोष्ट त्यांच्या शब्दसारणीशी सुसंगत नाही. म्हणजे प्रत्येक शब्दाला जे दोन अर्थ आहेत, त्यांपैकी एका अर्थाने एक शब्द वापरीत असावेत आणि उरलेल्या अर्थाने दुसरा शब्द वापरीत असावेत, इथपर्यंत तर्काने निभाव लागतो. पण त्यानंतर त्यांपैकी कोणता अर्थ 'अक्षर'च्या हवाली करावा व कोणता अर्थ 'अव्यय'च्या हवाली करावा, हा प्रश्न उरतोच. इथे परत व्युत्पत्तीकडे जावे, की परंपरेकडे जावे, हे ठरवावे लागते. मी अशा वेळी, अनेक कारणांमुळे, परंपरेकडे जावे, असे मानतो. साखरे, जोग व. द. के. पाठक हे सांप्रदायिक 'अक्षर' या शब्दाचा अर्थ माझ्या 'अविकारी' या शब्दाला पोषक असा करतात : साखरे व जोग 'निर्विकार' असा, पाठक 'विकाररहित' असा. सुबंधांच्या पाठामध्ये 'अव्ययम्' च्या ऐवजी 'एकलम्' असल्यामुळे हा प्रश्नच निर्माण होत नाही. म्हणून 'अक्षरम्' चे भाषांतर ते सरळ



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

'अविनाशी' असे करू शकतात. बहिरट या दोन शब्दांचे इंग्रजी भाषांतर अनुक्रमे 'Indestructible' व 'imperishable' या शब्दांनी करतात, पण त्यामुळे प्रश्न सुटला असे होत नाही. असो. पाठक 'अव्ययम्'चे भाषांतर माझ्याप्रमाणेच 'अविनाशी' असे करतात. जोगांच्या संहितेत 'अव्ययम्'ऐवजी 'केवलम्' असा पाठ असूनही ते 'अक्षरम्' चे भाषांतर निर्विकार असेच करतात, ही गोष्ट मला विशेष लक्षणीय वाटते. वरील विवेचनावरून मी 'अक्षरम्'साठी अविकारी व अव्ययम्साठी 'अविनाशी' असे मराठी शब्द का वापरले, ते स्पष्ट व्हावे; पण कुणी ज्ञानेश्वरीच्या आधाराने 'अक्षर'चा अर्थ 'अविनाशी' व 'अव्यय'चा अर्थ 'अविकारी' असा केला, तर तेही मी सयुक्तिकच समजेन. कदाचित, दांडेकरांनी सुचविल्याप्रमाणे, हा सगळाच माझी 'बुद्धी स्वैरिणी' झाल्याचा परिपाकही असेल!

३. 'अनाख्येयम्' या मुळातील संस्कृत शब्दासाठी मी 'अवर्णनीय' असा मराठी शब्द वापरला. पाठकही त्याचे भाषांतर 'अवर्णनीय' या शब्दानेच करतात. 'अनिर्देश्य' किंवा 'अनिर्वचनीय' असे शब्द वापरले, तर त्यांचे पुन्हा मराठी भाषांतर करण्याचीच पाळी येईल! नव्हे, सुबंधांवर तशी आलेलीच आहे; ते भाषांतर 'अनिर्देश्य' असे करतात आणि लगेच 'ज्याचे वर्णन करता येत नाही, असे' अशी पुढे पुस्ती जोडतात! 'अवर्णनीय' हा माझा शब्द दांडेकरांना 'चालसे' या जातीचा वाटत असेल, तर ते 'नेटका, समर्पक' शब्द का बरे सुचवीत नाहीत?

४. 'आनन्दम्' : या मूळ संस्कृत शब्दासाठी मी 'आनंदमय' असा मराठी शब्द वापरला. ओवीबद्ध अर्वाचीनीकरणात गृहीत असलेली यमकाची व अर्वाचीन मराठी भाषेच्या चलनाची निकड यामुळे इथे थोडी तडजोड करण्यात आलेली आहे, ही गोष्ट खरीच आहे. इथे माझ्या हातून निवृत्तिनाथांची 'पदावनती' घडली, असे दांडेकरांचे म्हणणे; पण त्यामुळे 'छे छे! यापुरता दुसरा अनर्थ कुठलाही नव्हे!' असे ठामवादाच्या पाठीवर बसून दांडेकरांनी ओरडत सुटावे, अशी वस्तुस्थिती खरोखर आहे का? 'आनंदमात्र' हा शब्द अर्वाचीन मराठीच्या घरी नांदणारा नाही, म्हणून बाजूला ठेवला, की आनंदरूप, आनंदस्वरूप, आनंदघन व आनंदमय हे सगळेच पर्याय चढत्या क्रमाने मूळ शब्दाशी थोडी तडजोड करतात. यमकाशी जमत असता, तर त्यांपैकी दुसरा एखादा शब्दही मी वापरला असता. मराठी वाचकाच्या मनावर 'आनंदमय' या शब्दाचा त्या विशिष्ट संदर्भात भावणारा परिणाम दांडेकर सुचवतात तसा '- चा केलेला' या अंगाने किंवा उपादानकारणाच्या अंगाने होत नाही. शब्दाचा असा सुटा, व्युत्पत्तीच्या अंगाने होणारा, किंवा तार्किक विचार नेहमीच अपुरा ठरतो. त्या ओळीतील इतर विशेषणांची सावली 'आनंदमय' या शब्दावर पडते आणि अंतिम परिणाम अस्तित्वदर्शीच होतो. म्हणजे प्रत्यक्षात



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

'पदावनती' होत नाही. पण ती होतच असेल, तर साखरे व सुबंध हे 'आनंदरूप', जोग हे 'आनंदस्वरूप' आणि पाठक हे 'सहजसुखमय' असे शब्द वापरून निवृत्तिनाथांची 'पदावनती' करण्यात थोडेफार सहभागी झालेले आढळतात; आणि तेही यमकाची निकड नसताना! पण सर्वांत मोठे गुन्हेगार ठरतात, ते यमकासाठी तडजोड करणारे करंदीकर किंवा वर उल्लेखिलेले सांप्रदायिक नव्हेत, तर वीरेश्वर व परमहंस हंसराज स्वामी! दांडेकरांना पुढे काय वाटेल, याचा विचार न करता, दुसरे पाठ उपलब्ध असतानाही, ते अनुक्रमे 'आनन्दमयमेकलम्' व 'आनन्दमयकेवलम्' हे पाठच स्वीकारतात. आता या 'आनंदमया'चा जाब परमहंस हंसराजस्वामींना विचारावा, की तो पाठच ज्ञानेश्वरांचा अस्सल पाठ ठरला, तर प्रत्यक्ष ज्ञानेश्वरांनाच विचारावा, हे दांडेकरांनी विचारपूर्वक ठरवावे. न्यायशास्त्रातील उपादानकारणाची भानगड माझ्यासारख्या माणसाला कळण्यासारखी नसली, तरी वर उल्लेखिलेल्या व्युत्पन्न व 'ज्ञानेश्वरशरण' माणसांना कळत असावी, असा माझा समज आहे.

५. 'इयें' : अर्वाचीनीकरणात हा शब्द मी गाळला, असे मानून, ही गोष्ट 'अयमात्मा ब्रह्म' या महावाक्यातील 'अयम्' शब्द गाळण्याइतकी दोषास्पद आहे, असे दांडेकरांचे म्हणणे. मी सामान्यत: अनुसरीत असलेल्या गोखल्यांच्या संहितेत 'ऐसीं इयें निरूपाधिकें' असे नसून 'ऐसीयें निरूपाधिकें' असे आहे. तेव्हा मी 'इयें' गाळले, अशी वस्तुस्थिती नाही. शिवाय संहितेत 'इयें' असते, तरी त्याला दांडेकर म्हणतात, तेवढा अर्थ व तेवढे महत्त्व मी दिले असतेच, असेही नाही.

६. 'देवोदेवी' : या मुळातल्या शब्दांचे मी 'शिवशक्ती' असे अर्वाचीनीकरण केले. 'अक्षरम्' व 'अव्ययम्' या शब्दांचा विचार करताना दांडेकरांची जशी गफलत झाली आहे, तशाच स्वरूपाची गफलत या ठिकाणी घेतलेल्या आक्षेपात झाली आहे. मूळ 'दिव' या धातूचा अर्थ 'प्रकाशणे' असा असला, तरी 'देवोदेवी'चे 'देवदेवी' असे अर्वाचीनीकरण करूनही दांडेकरांना अपेक्षित असलेल्या 'प्रकाशा'चा किंवा त्यावर आधारलेल्या 'साधर्म्या'चा प्रत्यय मराठी वाचकाला येण्याची शक्यता नाही. मराठी भाषेच्या अर्वाचीन व्यवहारात 'देव', 'देवी' हे शब्द त्यातील दीप्तीची व्युत्पत्तिप्राप्त प्रतिमा कार्यान्वित करीत नाहीत. मॅक्सम्युल्लरच्या भाषेत बोलायचे, तर त्या शब्दांतील दीप्तीच्या प्रतिमा या आता फक्त अकार्यक्षम अशा 'धातुप्रतिमा' (रॅडिकल मेटॅफर्स) आहेत; काव्यात्म प्रतिमा नव्हेत. उलट, 'शिव' व 'शक्ती' हे शब्द पुढच्या ओवीशी संगती राखणारे आणि अधिक काव्यात्म व भाववाहक आहेत, एवढेच नव्हे, तर त्यांच्यांतील साधर्म्य व परस्परपूरकता प्रकट करण्यात (लोकमानसातील अर्धनारीनटेश्वराच्या संकल्पनेमुळे) अधिक समर्थ आहेत.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

७. 'हा ठाववेन्ही वियोगभेडें' : मुळातील या शब्दांचे अर्वाचीनीकरण मी 'वियोगभय इतकें बडें' असे केलेले आहे. यातील 'बडें' हा शब्द दांडेकरांना खटकतो; आणि मला त्यांच्याहून अधिक खटकतो! पण तो खटकण्याची आमची दोघांची कारणे भिन्न आहेत : मला तो शब्द त्याच्या बटबटीतपणामुळे खटकतो; मला 'ठाववेन्ही' शी तुलना करता 'मोठे हा शब्दसुद्धा थोडा बटबटीत वाटतो; पण दांडेकरांना 'बडें' या शब्दाला मूळ ओवीत आधारच नाही, असे वाटते, आणि हा शब्द वापरून मी 'भाषासंकर' केला, असेही वाटते. 'हा ठाववेन्ही' या शब्दांत 'इतक्या अवस्थेपर्यंत', 'इतक्या उत्कटतेचे' अशा स्वरूपाचा उठाव आहे, असे मला वाटते. 'इतके' या शब्दात तो मावत नाही. जोग त्या शब्दाचा अर्थ 'पूर्वी सांगितल्याप्रमाणे' असा करतात; पाठक 'या ठिकाणापर्यंत (म्हणजे इतके की)' असा करतात; सुबंध 'इतके मोठे' असा करतात. शिवकल्याण तर त्यांच्या 'ठावो'ला 'आपला ठाव जो सुखधन । तो सांडितां भीति जाण' इतका गहन अर्थ देतात; तो मला खूपच अतिरिक्त वाटतो. मला सुबंधांचा 'इतके मोठे' हा अर्थ पटतो; पण 'मोठे' यमकात बसत नाही, म्हणून नाइलाजाने 'बडे' म्हणावे लागते. म्हणजे दांडेकर मुळात त्याला आधारच नाही, असे म्हणतात, ते बरोबर नाही. शिवाय तिथे 'भाषासंकर' झाला, असेही मला वाटत नाही. 'बडे' हा अर्वाचीन मराठीत आत्मसात केलेला नांदता शब्द आहे. पण भाषासंकर केव्हा वाटावा, याला निश्चित नियम नाहीत; बरेचसे ज्याच्या त्याच्या भाषाविषयक दृष्टिकोनावर अवलंबून राहते. मला तर अर्वाचीन मराठी वाचकासाठी लिहिताना कोणी कारणाशिवाय संस्कृत शब्द वापरले, किंवा कलात्मक प्रयोजनाशिवाय संतवाङ्मयातले जुने शब्द वापरले, तरी भाषासंकर झाल्यासारखे वाटते; पण आवश्यक तिथे जरब, जालीम, अवलिया, अवलाद सारखे अरबी शब्द किंवा टेबल, बटण, मटण, सोडा वगैरेसारखे इंग्रजी शब्द वापरले, तरी भाषासंकर झाल्याचे जाणवत नाही!'

"अर्वाचीनीकरण करताना अधिक दक्षता घ्यायला हवी" हा दांडेकरांनी दिलेला सल्ला ज्या विचारावर व आक्षेपांवर आधारलेला होता, त्याचा परामर्श माझ्या कुवतीनुसार घेण्याचा मी थोडाफार प्रयत्न केला. पण त्यामुळे माझा जुन्या संतवाङ्मयाचा अभ्यास आहे, असा गैरसमज कोणीही करू नये; न कळणारा विषय समजून घेण्याचा प्रयत्न करताना जे हाताशी लागले, त्याच्यावर केलेली ही गुजराण आहे, म्हणून दांडेकरांच्या बऱ्याच विचारांशी मी सहमत नसलो, तरी त्यांचा सल्ला मी अव्हेरला, असे नव्हे.

[हे दोन्ही लेख वाचल्यावर वाचक स्वत:चे मत बनवतीलच, तें बनवताना काही निरीक्षणं उपयुक्त ठरावी.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

१. 'ज्ञानेश्वरशरण होणें' हा शब्दप्रयोग करंदीकरांना खटकला. त्याचा दुसराही एक अर्थ निघू शकतो. ग्राह्याग्राह्य ठरवताना व्याकरणकाराने प्रयोगशरण व्हायला पाहिजे, त्याचप्रमाणे ग्राह्याग्राह्य अर्थ ठरवताना केवळ कोश व्याकरणावर अवलंबून न राहता मूळ कर्त्यांच्या प्रयोगाचा धांडोळा घ्यायला पाहिजे. हा विचार, खरें म्हणजे, उभयताना मान्य होण्याजोगा आहे.

२. उभयतांना मान्य होण्याजोगा दुसरा विचार म्हणजे अनुवादकर्त्यांनि आपलें काम दक्षपणे करायला पाहिजे हा विचार. मतभेद दिसतो, तो दक्षता कशा प्रकारची, याबद्दल. अनुवादाचें काम शास्त्र आहे, असें दांडेकरांना वाटतें. (करंदीकरांना खटकणारा ठामवादीपणा, तो हा!) उलट, ती एक कला आहे, असे करंदीकरांना वाटते (दांडेकरांना खटकणारी स्वैरिणी बुद्धि, ती ही!) मूळ ग्रंथाशी इमान राखण्याची दक्षता घ्यायची आहें, खरें. दांडेकरांना तो तत्त्वग्रंथ वाटतो; करंदीकरांना तो तत्त्वकाव्यग्रंथ वाटतो, हा दोघांमधला आणखी एक फरक. अनुवादभाषेशी इमान राखण्याची दक्षता घ्यायची हेंही खरें. पण करंदीकरांनी केलेला अनुवाद योग्य नाही, हें दाखवताना योग्य अनुवाद कोणता, हें सुचवण्याची जबाबदारी दांडेकरांनी न स्वीकारल्यामुळे या दुसऱ्या दक्षतेकडे दांडेकरांचें बरेंचसें दुर्लक्ष झालेलें दिसतें.

३. 'अनुभवामृत' हेंच शीर्षक योग्य, असे ठरवताना दांडेकरांनी सहाव्या प्रकरणातील काही ओव्यांचा हवाला दिला आहे. त्याच चालीवर 'सिद्धानुवाद' शीर्षकाची फोड सिद्ध मंडळींचा अनुवाद अशी न करता आयत्या सिद्धांताचा अनुवाद अशी करण्यासाठी दहाव्या प्रकरणातील ८-१३ (७७८-७८३) या ओव्यांचा हवाला देता येईल.

४. मूळ ग्रंथकार शब्दांच्या निवडीबद्दल दक्ष आहे. ही दक्षता केवळ शब्दांच्या काव्यगुणांबद्दल नसून त्यांच्या तत्त्वदर्शित्वाबद्दलही आहे. नमनाचे संस्कृत श्लोक सूत्ररूप आहेत, हें दांडेकरांप्रमाणेच करंदीकरांनाही मान्य दिसतें. (अर्वाचीनीकरणाला त्यांनी जोडलेल्या 'अहो ज्ञानेश्वर' या लेखातील पृष्ठ १५ वरचा उल्लेख पाहावा.) अशा परिस्थितीत तत्त्वदर्शी अर्थगर्भतेबद्दल नमनाच्या या टप्प्यावर तर विशेषच दक्षता घ्यायला पाहिजे. अक्षर, अज आणि अव्यय ही विशेषणे विशेष अभिप्रायाने आलेली आहेत. पैकी अक्षर आणि व्यय यांचे कोशातले अर्थ imperishable, unchanging, undecaying असे आहेत. (तिसरा अर्थ करंदीकरांच्या हातून सुटला आहे.) म्हणजे कोश निर्णायक नाही. दांडेकरांनी मानलेला व्युत्पत्तीचा आधारही त्यांना वाटतो तितका निर्णायक नाही. करंदीकरांनी मानलेला पारंपरिक अर्थग्रहणाचा आधारही त्यांना वाटतो तितका निर्णायक नाही. हा सर्वांपेक्षा भरवशाचा आधार तुल्य संदर्भातील संस्कृत प्रयोग. असे काही संदर्भ सांगायचे तर यास्कप्रणीत षड्भावांपैकी 'अस्ति' सोडून उरलेले पाच आणि भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायातील २०-२१



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

हे श्लोक. यास्क, गीता, ज्ञानेश्वरांच्या नमनाचा पहिला श्लोक यामधली तुल्य शब्दयोजना अनुक्रमे अशी आहे -

| | | |
|---|---|---|
| जनन (जन्माला येणे) | अज | अज |
| वर्धन (वाढणे) | पुराण | - |
| विपरिणाम (बदलून जाणे) | नित्य | - |
| अपक्षय (ऱ्हास पावणे) | शाश्वत, अव्यय | अव्यय |
| विनाश (नष्ट होणे) | अविनाशी | अक्षर |

'अव्यय' शब्दाचा 'undecaying, वेच न होणारें हा अर्थ याप्रमाणे पक्का झाल्यावर 'अक्षर' शब्दाला imperishable आणि unchanging हे दोन अर्थ उरतात. ज्या दैवताचा आश्रय घ्यायचा, त्याचे वर्णन imperishable असे करणें अधिक सयुक्तिक वाटते. अर्वाचीनीकरणास 'अविकारी'च्या जागी 'अविनाशी' घातल्यास ते अर्थाला आणि लयीलाही अनुकूल ठरावे. पुढच्या ओळीत 'अविनाशी'च्या जागी झीज, ऱ्हास नसणारा या अर्थाचा लयीला अनुकूल शब्द न मिळाला ('अक्षय/अक्षयी' चालेल ?)' तर अविकारी हा uncanging या अर्थाचा शब्द आपद्धर्म म्हणून पत्करायला हरकत नसावी.

५. हीच तत्त्वदर्शी अर्थगर्भतेबद्दलची मागणी पहिल्या ओवीतील 'देवोदेवी' शब्दाच्या अर्वाचीनीकरणालाही लागू होते. कारण ही ओवी नमनाच्या तिसऱ्या व चौथ्या श्लोकाशी अनुसंधान राखणारी आणि म्हणूनच त्याच वजनाची आहे. 'देवोदेवी' हा शब्द आपटयांच्या कोशात नाही, तो काश्मिरी शैवमतात 'शिवशक्ति' याला पर्याय म्हणून वापरला जातो. ('अहो ज्ञानेश्वर' पृष्ठ ७ पहावे) त्या शब्दाने प्रकाशमयता अर्वाचीन मराठी वाचकाला भले प्रतीत न होऊ दे, ती ज्ञानेश्वरांना नक्कीच अभिप्रेत होती. पाठोपाठ येणारी आठवी ओवी पाहावी.

जया एके सत्तेचें बैसणें । दोघां एका प्रकाशाचें लेणें ।
जे अनादि एकपणे । नांदती दोघें ।।

तेव्हा अर्वाचीनीकरणात 'देवोदेवी' शब्द आणता आला नाही, तरी 'दिव्य' अशासारखा शब्द त्या ओवीत आला असता, तर बरें होतें.

अनुवादाप्रमाणे अनुवादसमीक्षा हेंही मोठ्या जबाबदारीचें काम आहे, एवढें मात्र नक्की!

□ □

- अशोक रा. केळकर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

# कवितेतील भाषा-व्यवस्थेशी निगडित प्रतिमासृष्टी

**नीलिमा गुंडी**

भाषेतून भाषेपलीकडचे आशयाचे जग तरलपणे व्यक्त करण्यासाठी कवींना भाषेचे स्वतंत्र, सूक्ष्म असे भान सतत असावे लागते. कुंभाराला जशी माती मळून घ्यावी लागते, तशी कवींनाही उपलब्ध भाषा वाकवून, मळवून घ्यावी लागते, हे खरे! त्यासाठी त्यांना भाषेची अंगभूत क्षमता, तिची व्याकरणिक मोडणी, तिच्यातील अक्षरचिन्हे, विरामचिन्हे, इ. तून आलेली प्रसरणशीलता कवितेसाठी कलात्मकदृष्ट्या योजावी लागते. व्यवहारातील शब्द अर्थभारित करून कवितेतील 'गाणारे शब्द' घडवण्याचे काम कवी करतातच. त्याहून महत्त्वाचे म्हणजे अभिव्यक्तीचे माध्यम या नात्याने भाषेचाच ध्यास घेतल्यासारखा शोध घेणे, तिच्यातील चिरेबंदीपणाला धडका मारणे, तिच्यातील सर्जनशील सामर्थ्य टिकवण्याचा प्रयत्न करीत राहणे हेही अनेक कवी करीत असतात. उदा., लोककवी मनमोहन यांची 'लढाई' ही कविता शब्द आणि अर्थ यांच्यांतील एका संघर्षाचे रूप रेखाटते.

'अर्थाची आक्रमणे येथे! शब्दांच्या रांगांवर होती'

तसेच

'लिपी कोशिची झाली लवचिक ।
व्याकरणावर पान्हे पडले ॥
क्षितिज जरासे खाली लवले
पृथ्वीनेही पाय उचलले ॥'

असेही ते दुसऱ्या एका कवितेत लिहितात.

प्रस्तुत लेखात भाषाव्यवस्थेशी निगडित प्रतिमासृष्टी मराठी कवितेत कसकशा स्वरूपात आढळते, यांचा सोदाहरण शोध घेण्याचा प्रयत्न आहे.

कवी गोविंदाग्रज यांची 'विरामचिन्हे' ही कविता सर्वप्रथम आठवते. विरामचिन्हे ही भाषालेखनाशी संबंधित संकल्पना होय. लेखनातील टप्पे, भावनिक चढउतार सुचवणे, तसेच आशयाची मांडणी नेमकेपणे करणे; हे त्यांचे काम आहे. गोविंदाग्रज



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

या कवितेत विरामचिन्हांना आयुष्यातील टप्प्यांचे निदर्शक असे प्रतीकात्मक अर्थ देतात. बाल्यामध्ये मनात स्वल्पविराम, तरुणपणी जगाच्या स्वरूपाविषयी प्रश्नचिन्हे, गृहस्थाश्रमात अर्धविराम आणि पुढे दृष्टी व्यापक झाल्यावर दिक्‌काल यांचे अनंत रूप बघताना मनात उमटणारे उद्‌गारवाचक - असा हा प्रवास आहे. भाषा आणि जीवन याचे रूपक यात गृहीत धरलेले आहे. हे महत्त्वाचे!

भाषेतून तरल भावना व्यक्त करताना शब्दांपेक्षा विरामचिन्हांकडे वळावेसे अनेक कवींना वाटत असावे. इंदिरा संतांच्या 'पूर्णविराम' या कवितेत 'अर्ध-स्वल्प-विरामांचे

रेंगाळणे जीव घेत,
उद्‌गाराची तशी कांडी
उगा जीव भुलवीत!''[३]

अशा ओळी येतात. पुढे प्रश्नचिन्हांचा हूकही येतो. आणि 'अर्ध्या अपुऱ्या वाक्याशी, पूर्णविरामाची खूण!' यावीशी वाटते. प्रियकराचे मनोगत ऐकतानाची असीम उत्कंठा, कातरता आणि त्यामुळे ताणरहित परिपूर्ण मनोऽवस्था बहाल करणाऱ्या पूर्णविरामाची आधीच वाट पाहणे - असा भावविभ्रम यात उमटला आहे.

भाषिक चिन्हांना चित्ररूप देणाऱ्या मनमोहनांच्या एका कवितेचाही उल्लेख करण्याजोगा आहे. 'सरणावर सरणारांच्यासाठी' या कवितेत ते लिहितात :

'तडकता तडकता नाद निघे
घट विस्तवावरी लिही कविता
स्फुल्लिंगांचे अनुस्वार, वेलांट्या
वाकड्या ज्वालेच्या, रफारही तसेच
अक्षरांना पेलता न येणारे भाव
तेवढेच तो उद्‌गारातून बोले.'[४]

शब्दमाध्यमाची अशा 'पेलता न येणाऱ्या भावनां'बाबतची अंगभूत मर्यादा कवींना एक असोशीची जाणीव करीत राहते. बा. सी. मर्ढेकरांनी याच जाणिवेतून केलेली आळवणी पुन्हा अशीच व्याकरणिक संज्ञांशी निगडित आहे. मर्ढेकर लिहितात :

'कधी लागेल गा नख
तुझे माझिया गळ्याला
आणि सामर्थ्याचा स्वर
माझिया गा व्यंजनाला!'[५]

भाषेतील व्यंजनांना स्वरांमुळे पूर्णता येते. येथे व्यक्ती व कलावंत या नात्याने (व्यंजनाच्या प्रतिमेतून) स्वतःची अपूर्णता व्यक्त करून कवी ईश्वरी कृपेची आळवणी करतो.

व्याकरणातील काही संज्ञांवर श्लेष करून लिहिलेल्या रूपकात्मक कविताही



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

आढळतात. उदा., विंदा करंदीकरांची 'अव्यय ते एक। सांडले गा।' ही कविता.[६] यात अव्यय, कृदंत, नाम, सर्वनाम, कर्म, कर्ता, विशेषणे, क्रियापदे अशा व्याकरणाशी निगडित कल्पना खुबीदारपणे योजिल्या आहेत. कवीची भाषेवरील पकड आणि कलात्मक चातुर्य लक्ष वेधून घेते. भाषेचे नियमन करणाऱ्या व्याकरणातील वेगवेगळ्या संज्ञांना नियोजित असे कर्तव्य आहे. हा धागा पकडून कवी सुरुवातीलाच जेव्हा म्हणतात 'अगा क्रियापदा, केव्हा येसी भेटी' तेव्हा मराठी वाक्याच्या सरळसाध्या मोडणीनुसार शेवटी येणारे आणि भाषिक विधानाला परिपूर्णत्व देणारे क्रियापद हे जीवनाच्या सर्वोच्च श्रेयाच्या - मोक्षाच्या - पातळीवर अलगद उचलले जाते. भाषा आणि जीवन यांतील रूपक येथेही अध्याहृत आहे. भाषेत अनागोंदी व्हावी, तसे सांस्कृतिक पातळीवरील येथील जगणे आहे. 'विशेषणे फक्त माजली अनेक' विशेषणे ही वर्णन करणारी, अर्थ फुलवणारी - अर्थाचा गाभा हरवलेल्या शब्दांची सूजच! अशा वेळी 'अव्यय ते एक। सांडले गा।' ही कवीची खंत आहे. स्वत: न बदलता इतर शब्दांना अर्थदृष्ट्या परस्परांशी बांधण्याचे काम करणारी अव्यये साहजिकच चिरंतन मूल्यांचे प्रतीक बनतात. शेवटी कवी पुन्हा क्रियापदाला 'अर्थ'पूर्णतेसाठी पाचारण करतो. तेव्हा एका कवीची सर्जनव्यवहारातील धडपडही त्यात ऐकू येते. कारण काहीही सांगण्याजोगे नसतानाही व्याकरणदृष्ट्या पूर्ण (प्रत्यक्षात निरर्थक) वाक्य लिहिता येत असते. त्यामुळे वरवर पूर्णतेचा आभास होतो. 'वैकुंठास गेलो। आत्म्यावीण' अशी ही अवस्था! सांस्कृतिक पातळीवर मूल्यभ्रष्ट जगणे आणि भाषिक पातळीवर अर्थभ्रष्ट लिहिणे, हे कवीला सारखेच वाटते. कवीच्या लेखी असलेला शब्दाचा मूल्यभावही यातून अधोरेखित होतो.

सदानंद रेगे यांची 'शब्दयोगी' ही कविताही अशीच अर्थदृष्ट्या एकाच वेळी दोन पातळ्यांवर वावरणारी आहे.[७]

शब्दयोगी अव्यय शब्दाला जोडून येते. स्वत: 'अ-व्यय' (स्थितप्रज्ञ!) राहून दोन शब्दांना अर्थदृष्ट्या जवळ आणते. त्याचे हे वैशिष्ट्य कविमनात त्याच्याविषयी गूढभाव निर्माण करते. येथे दुसऱ्या अर्थाने 'शब्दयोगी' हा कवीच्या कल्पनेने निर्माण केलेला एक प्रकारचा सिद्धी असलेला योगी (व्यवहारी जगाच्या दृष्टीने वेडा!). हा शब्दयोगी 'वडाखाली' राहणार : हे तर साहजिकच! शब्दयोगी अव्ययाचा वापर आणि प्राचीन, विराट वृक्षाखाली योग्यांचे वास्तव्य - या दोन्ही अर्थवलयांची येथे कलात्मकरीत्या सांगड घातली आहे. पुढे या कवितेत शब्दांमधील गूढ सामर्थ्याचे सूतोवाच आहे. अव्ययाकडे पाहताना एकेक अवयव लय पावणार आहे. वड ⟶ वेडा, अव्यय ⟶ अवयव असे एका शब्दावरून दुसऱ्या शब्दाकडे झेपावणे आणि निसरड्या वाटांनी अर्थपूर्णतेकडे जाण्याचा प्रयत्न करणे - ही रेग्यांची लकब येथेही दिसते. एकंदरीत ज्याचे शब्द ऐकताना समाधी लागावी, असे शब्दांमधील अंगभूत



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

सामर्थ्य जवळ असणारा योगी - (साहित्यिक) - येथे अभिप्रेत आहे. व्याकरणातील संज्ञेला कवीने येथे गूढ व्यक्तिमत्त्व दिले आहे.[७]

कुसामग्रजांची 'विशेषणे' ही कविता देखील रूपकात्मक आहे.[८] यात भाषेतील भुसा भरल्यासारखी असलेली विशेषणे कवीला अस्वस्थ करतात. ही विशेषणे संस्कृतीसाठी योजलेली असावीत, याचे विशेष दु:ख वाटते. सावेश बोलताना नि:सत्त्व होत जाणारी भाषा आणि तिच्या सच्चेपणाचा शोध घेणाऱ्याला मरणाची शिक्षा ठोठावणारी संस्कृती - ही वस्तुस्थिती परस्परावलंबीच म्हणावी लागेल. संस्कृतीसाठीची उदार, न्यायी, इ. विशेषणे झिडकारणारा तरुण म्हणतो :

'पण या प्रत्येक विशेषणाखाली
एकेक प्रेतागार आहे,'
तेव्हा त्याचेच प्रेतात रूपांतर होते आणि
'विशेषणांच्या सरणावर
त्याला जाळून टाकले' असा कवितेचा शेवट होतो.

भाषिक व्यवहारातील खोटेपणा आणि संस्कृतीतील कोडगेपणा याचे एकसंध दर्शन घडवणारी ही कविता, त्यातील उपरोधामुळे धारदार झाली आहे.

भाषा आणि जीवन यांचे रूपक गृहीत धरून आशय व्यक्त करणारी अरुण कोलटकरांची 'तक्ता' ही कविता अशीच महत्त्वपूर्ण आहे.[९] तक्ता हे भाषा शिकवण्यासाठीचे एक प्राथमिक साधन. त्यात प्रत्येक सचित्र अक्षर ठरावीक चौकोनात रेखाटलेले असते. तक्त्यातील अक्षरे आणि चित्रे त्यांचा क्रम, त्या क्रमातील असंगती यांचे बोट धरून कवी जीवनातील असंगतीचा अनुभव देतो. 'सगळे आपापले चौकोन सांभाळून बसलेत' अशा अवस्थेतील सुटया अक्षरांच्या प्रतिमा व्यक्तींच्या परस्परांशी असलेल्या संबंध-शून्यतेचे दर्शन घडवतात. त्यात पुराणकथेचा मार्मिक संदर्भही येतो.

'आई बाळाला उखळात घालणार नाही,'
'भटजी बदकाला लसणाची फोडणी देणार नाही.'

अशा ओळीतून सुटया अक्षरांचे क्रियाशून्यत्व अधोरेखित होत जाते.

भाषा काही मर्यादेपलीकडे घडवताही येत नाही. पुन्हा भाषेची अभिव्यक्ती करताना लिपीची मदत घ्यावी लागते. या अपरिहार्यतेचा जाणवणारा काच प्रभा गणोरकरांच्या 'लिपी' या कवितेतून जाणवतो.[१०] त्यात सुरुवातीला गूढ चित्रलिपीचे वर्णन येते. त्यातील गूढाचा अर्थ उकलताना कवयित्री त्यात गुंतते आणि म्हणते :

'हळुहळु चिन्हे अदृश्य होत जातात आणि नवी
चिन्हे उमटू लागतात त्यांच्याजागी
माझी भाषा, माझा शब्द, माझा आवाज हरवलेला आहे या कोलाहलात.
तर मलाही अशी वेगळी लिपी शोधावी लागेल.'



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

कवयित्रीची यातील व्यथा वैयक्तिक पातळीवरील न राहता सांस्कृतिक पातळीवरील ठरते. कारण या व्यथेमागे भाषेचा हिंस्र/असंस्कृतपणे होणारा वापर कारणीभूत आहे. व्यक्तीचा शब्द म्हणजे त्याचे आत्मभान टिकविणारे मूल्यच असते. ते ठरवले, की लिपीही नव्याने घडवावीशी वाटू लागते.

भाषेतून व्यक्त होणारे आत्मभान हे व्यक्तीला सांस्कृतिक प्रतिष्ठा मिळवून देऊ शकते. हा आशय नारायण कुलकर्णी - कवठेकरांच्या 'शिकवण' या कवितेतून व्यक्त होतो.[११] कवीने तान्ह्या मुलीच्या भाषिक निरीक्षणातून ही कविता लिहिली आहे. तिची स्वर उच्चारण्याची धडपड, बड, बूऽ, बबबबू, अबबऽ, अर्र, बर्र, बब्रीऽ असे तिचे ध्वनींशी खेळणे कवी नोंदवीत जातो. आणि 'ती लवकरच 'ब्र' उच्चारेल' असा कवितेचा शेवट होतो. ब्रही न उच्चारणे - भीतीने मूक राहणे - हा मराठीतील वाक्प्रचार. येथे मुलीच्या दृष्टीने वरवर निरर्थक वाटणारा 'ब्र'चा उच्चार तिला भाषेचे संपन्न सामर्थ्य देणारा - तिची वैयक्तिक भीती दूर करणारा तिला आत्मसामर्थ्याचा आणि समाजाशी जोडलेपणाचा अनुभव देणारा म्हणून पाहिला आहे. पुन्हा हा अनुभव मुलीबाबत असल्यामुळे आपल्या समाजात तिच्या आत्मसामर्थ्याचे विशेष महत्त्व आहे.

भाषा-व्यवस्थेत रिकाम्या जागाही अर्थपूर्ण असतात. याचीही कवींना जाणीव आहे. गोविंदाग्रज लिहितात : 'गूढार्थचि तो अलिखित जागी मत्कवनी भरुनी राही', तर आरती प्रभू 'दोन शब्दांमधल्या रिकाम्या जागेतला स्वर्ग' असे म्हणून शब्दांअल्याड-पल्याडच्या सामर्थ्याची कल्पना देतात. एकंदरीत भाषेचे नवसर्जन करण्याच्या प्रयत्नात कवींना भाषाव्यवस्थेशी निगडित अनेक संकल्पना खुणावतात. तरीही एकूण काव्यसृष्टीच्या तुलनेने या संदर्भातील प्रतिमांना काव्यरूप देणारे कवी संख्येने कमी आढळतात; हेही लक्षात येते.

### संदर्भसूची


१. 'लढाई' (क्षितिज जरासे खाली लवले) "आदित्य" (कवि मनमोहन), संपा. शंकर वैद्य, काँटिनेंटल प्रकाशन, पुणे, १९७१, पृ. १८ व १२.
२. 'विरामचिन्हे', "वाग्वैजयंती", (गोविंदाग्रज) संपा. वाळिंबे, राणे प्रकाशन, पुणे, १९६५, पृ. २३०.
३. 'पूर्णविराम', "शेला", इंदिरा, मौज प्रकाशन, मुंबई, आ. २, १९६६, पृ. ७०.
४. 'सरणावर सरणारांच्यासाठी, "आदित्य", उनि, पृ. ८.
५. 'मर्ढेकरांची कविता', मौज प्रकाशन, मुंबई, १९६९, पुनुर्मुद्रण, पृ. १५०.
६. 'अव्यय ते एक! सांडले गा', "धृपद", विंदा करंदीकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९५९, पृ. १२०.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

७. 'शब्दयोगी', ''वेडच्या कविता'', सदानंद रेगे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८०, पृ. ८१.
८. 'विशेषणे', ''प्रवासी पक्षी'' (कवी कुसुमाग्रज) संपा. शंकर वैद्य, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई १९८९, पृ. १४.
९. 'तक्ता', '' अरुण कोलटकरच्या कविता '', प्रास प्रकाशन, मुंबई १९७७, पृ. १३०-१३१.
१०. 'लिपी', '' विवर्त'' प्रभा गणोरकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८५, पृ. ५०.
११. 'शिकवण' ''हे माझ्या गवताच्या पात्या'' नारायण कुलकर्णी-कवठेकर, मौज प्रकाशन, मुंबई, १९८२, पृ. १२६.

**३, अन्नपूर्णा, १ ला मजला, १२५९, शुक्रवार पेठ,**
**सुभाषनगर, ५ वी गल्ली, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२**



## संस्कृत व्याकरणातील अनियमितपणा

एका राजाच्या पदरी अनेक विद्वान होते. पण त्यांमध्ये वैयाकरणांना फार मोठा मान मिळतो हे पाहून नैयायिक फार अस्वस्थ होते. त्यांनी राजाकडे तक्रार केली. तेव्हा राजाने वैयाकरणांच्या जागी त्यांना पौराहित्य करण्यास संगितले. राजाच्या षष्ट्यब्दीपूर्ती समारंभात प्रथम सात चिरंजीवींची पूजा करण्याचा प्रसंग आला. अश्वत्थामा, बलि, व्यास, हनुमत्, बिभीषण, कृप आणि परशुराम हे ते सात चिरंजीवी होत. या पूजेत प्रत्येक चिरंजीवीला 'नम:' या अव्ययाने नमस्कार विहित होता. नम: या अव्ययाला चतुर्थीची अपेक्षा असते. नैयायिक व्याकरणाच्या बाबतीत कच्चे असतात, असा समज रूढ आहे. या समारंभात नैयायिक पुरोहिताने 'अश्वात्थामाय नम:' असा पहिला नमस्कार मंत्र म्हटला. तो अर्थातच चूक होता. वैयाकरणांनी लगेच 'अश्वत्थाम्ने नम:' अशी दुरुस्ती सुचवली. सावध झालेल्या नैयायिकाने पुन्हा चूक होऊ नये म्हणून 'बलिम्ने नम:' असा मंत्र म्हटला. लगेच वैयाकरणाने 'बलये' अशी दुरुस्ती सुचविली. तिसऱ्या मंत्राचे वेळी नैयायिकाने सावधगिरी राखून 'व्यासये' असा प्रयोग केला. तोही चूक ठरला. वैयाकरणाने अर्थातच 'व्यासाय' अशी दुरुस्ती सांगितली. पुढे चूक होऊ नये म्हणून नैयायिकाने दक्षतापूर्वक 'हनूमताय' असा प्रयोग केला. तोही चूक ठरला वैयाकरणाने तत्परतेने 'हनूमते' अशी दुरुस्ती केली. नंतरच्या मंत्रात नैयायिकाने मागील मंत्राच्या अनुकरणाने 'बिभीषणे' असा प्रयोग केला. तोही चूक ठरून वैयाकरणाला 'बिभीषणाय' अशी दुरुस्ती करणे भाग पडले. इतक्या चूका झाल्यावर आता आपली धडगत नाही हे नैयायिकाच्या लक्षात आले आणि तो वैयाकरणाला सपशेल शरण गेला. □

**(श्री. वा. बा. भागवत यांच्या 'पाणिनीय व्याकरण आणि भाषा तत्त्वज्ञान' या ग्रंथातून संस्कारपूर्वक पृ. ३६-३७)**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

१

# कवींचे निरंकुशत्व

वसंत पाटील

मराठी काव्याचा अभ्यास करताना असे दिसून येते, की छंदोबद्ध कवितेची भाषा वेगळी म्हणजे तिचे व्याकरण वेगळे! कै. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी पंच्याहत्तर वर्षापूर्वी आपल्या पद्य रत्नावलीच्या शेवटी एक अभ्यासपूर्ण निबंध जोडला आहे. 'मराठी कवितेतील व्याकरणाचे विशेष' असे त्याचे शीर्षक आहे. 'या निबंधात कवितेत येणाऱ्या सर्व फेरफारांचा संग्रह झाला नाही.' असे शास्त्रीबावांनी स्वत:च म्हटले आहे. त्यात कविभाषेतील सर्वच बदल संगृहीत केले आहेत, असे नाही. 'तथापि, या गोष्टीविषयीचा हा यत्न पहिलाच आहे.' असे चिपळूणकरांनी स्वच्छ नमूद केले आहे.

मराठी काव्य पाहिले असता असे निदर्शनास येते की, मराठी कवितांचा सुभा हा गद्याहून वेगळा मानला गेला आहे. त्यामुळे तेथील नियामक व्याकरण वेगळे. गद्यलेखनाचे नियम हे सर्वसंमत असेच आहेत. मात्र कवितेची भाषा वेगळी हे मराठीच्या बाबतीत का असावे, हा प्रश्न मनात उभा राहतो.

तशी मराठी भाषा बरीचशी संस्कृतानुसारी आहे. बरेचसे व्याकरण, छंद:शास्त्र व काव्यशास्त्र ही संस्कृतलाच अनुसरणारी आहेत. असे असताना मराठी कवितारचनेने आपला सवतासुभा स्थापन करावा, याचे आश्चर्य वाटते.

शास्त्रीबोवा म्हणतात, 'आपण जीस एकभाषा म्हणतो, तीतही पोटचे भेद पुष्कळ असतात. वय, स्त्रीत्व, पुरुषत्व, जाती, श्रद्धा, इ. प्रकारांनी भाषा भिन्न होते... तसेच लिहिण्याच्या भाषेतही गद्यात्मक ग्रंथाच्या भाषेहून पद्यात्मक ग्रंथाची म्हणजे कवितेची भाषा पुष्कळच निराळी असते... शब्दांतील ईकार व ऊकार कवितेत छंदाच्या अगर यमकाच्या अनुरोधाने दीर्घ किंवा ऱ्हस्व लिहितात.

१) वायुला, कविने, धेनुचा, गतिस, इ. रूपे करण्याचा प्राचीन व प्रतिष्ठित मराठी कवींचा संप्रदाय आहे. आणि अजि (आज), त्यासि (त्यास), जरि (जर), करूनि (करून), चि(च) हे सर्व ऱ्हस्व-दीर्घ बदल छंदादिकांच्या अनुरोधाने केले



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

जातात असे चिपळूणकर म्हणतात.

२) झाल्या (झालिया), केल्या (केलिया), त्या (तिया न होता तया), जीस (विकल्पे 'जयेस') हे बदल 'संयोगकृत कठोरत्व कमी करण्यासाठी', वा छंदाच्या अक्षरपूर्तीसाठीच केले जातात.

३) करून (करोन), पाहून (पाहोन) दोन्हीही रूपे वापरण्याचा संप्रदाय आहे. छंदाच्या अनुकूलतेसाठी हीच अव्यये करोनिया, पाहोनिया, अशीही लिहिली जातात.

४) अकारान्त पुंलिंगी शब्दांच्या प्रथमेचे रूप उकारान्त लिहिण्याचा संप्रदाय आहे. उदा., नाश (नाशु), वसंत (वसंतु), सागर (सागरु), गोविंद (गोविंदु), यांचे मूळ शास्त्रीबोवांना माहाराष्ट्री प्राकृतात दिसते. प्राकृत भाषेत देहो, नरो, गजो अशी रूपे येतात...या आकाराचा उकार झाला, असे त्यांचे म्हणणे सयुक्तिक वाटते. हा उकार क्रियापदासही लागला, असे ते पुढे म्हणतात. उदा., विसरवितु, सांगतु, इ. हे बदल केवळ यमक साधण्यासाठीच आहेत.

५) कवितेत नामाला लागलेला प्रत्यय लुप्त होतो. उदा., रूपा भुलला, त्या देई. तृतीयान्त नामे 'ही' प्रत्ययान्त दिसतात. केवळ कवितेत! संस्कृतातील तृतीयेच्या 'भि:' या प्रत्ययाची 'ही' झाली.

६) संस्कृतानुसारी विशेषणांचा वापर आढळतो. विशेष्याला विशेषण अनुसरते - लिंगवचन विभक्तीच्या बाबतीत. उदा., सुंदरीं वदनीं...

७) तयास, तयाने, तियेस, तियेने, तयेस अशीही सर्वनामाची रूपे आढळतात. 'ती, ही' या जागी ते हे, त्वां, म्यां - तुवां, मिया, कोण - कवण ही अशी रूपे जुन्या मराठी काव्यात येतात. अर्वाचीन कवितेतही दिसून येतात.

८) करी, टाकी, बसे ही रीतिभूतकालाची रूपे कवितेत वर्तमान काळाच्या अर्थाने वापरतात.

९) बोलुनि, सोडुनि (क्रिवि), पासुनी, आतुनी, जवळी (शब्द. अ.) यातील इकार छंद व प्रास यांच्या अनुरोधाने कधी 'ऱ्हस्व' होतो कधी 'दीर्घ' होतो, असे चिपळूणकर म्हणतात.

काव्यरचनेतील अशा पुष्कळ बदलांची शास्त्रीबोवांनी नोंद घेतली आहे.

हे सर्व विवेचन पाहून मनात येते : मराठी कवींना निरंकुशत्वाचा परवाना कसा मिळाला? बालपणी जिज्ञासेपोटी गुरुजींना विचारल्यावर 'कवी हे निरंकुश असतात', असे उत्तर मिळे. वास्तविक पाहता मराठी भाषा ही बरीच संस्कृतानुसारी आहे. प्राचीन व अर्वाचीन मराठी कविता ही बरेच छंद (वृत्तरचना) संस्कृतापासून घेते, पण संस्कृतामध्ये अशी छंदाच्या सोयीसाठी वाकवलेली अनिर्बंध रचना दिसत नाही. संस्कृत भाषा गद्य असो, पद्य असो - सारी कशी शिस्तीत व्याकरणाची



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

बंधने सहजतया पाळून डौलात चाललेली दिसते. शब्दातील ऱ्हस्व-दीर्घ काटेकोरपणे पाळले जाते. अगदीच अपवादाच्या ठिकाणी नियम किंचित दूर सारला जातो. उदा., कालिदासाने मेघदूतात 'नीचैराख्यं गिरिमधि गिरिमधिवसेस्तत्र विश्रामहेतो: (१-२५) असे लिहिले. यातील 'विश्राम' शब्दाच्या योजनेबद्दल केवढा आक्षेप घेतला! कारण पाणिनीच्या मते 'विश्रम' शब्दच शुद्ध बनतो. इतर व्याकरणकारांनी 'विश्राम' असाही शब्द सिद्ध केला आहे. हा दोष दूर करण्यासाठी 'विश्रांति' हा व्याकरणशुद्ध शब्द स्वीकारावा, असे विद्वानांनी सुचविले. महाकवी कालिदासावर देखील टीका करण्यास त्यांनी मागे-पुढे पाहिले नाही. पण शेवटी 'विश्राम' हा शब्द रूढीने मान्य केला आहे, असा निर्णय दिला.

संस्कृत काव्यरचनेत छंदासाठी शब्दांतील ऱ्हस्व-दीर्घ हे कधीच बदलण्यात आले नाहीत. वास्तविक पाहता संस्कृत भाषेत श्लोकरचना करणे हे मराठीच्या तुलनेने अधिक कठीण आहे. कारण त्यात व्याकरणाच्या नियमांचे काटेकोर पालन करणे गृहीत असते. अशा स्थितीत व्याकरणाची क्लिष्ट रूपे योजूनही काव्यरचना करताना कवी कधी अडखळताना दिसत नाही. समासयोजनेची सहज सोय हेही याचे एक कारण असू शकेल. कवींनी काव्यरचना करताना कुठल्याही शब्दाची ओढाताण केलेली दिसत नाही. हे गीर्वाणवाणीचे वैभव समजले पाहिजे. काश्मीर ते कन्याकुमारी व गुजरातपासून बंगालपर्यंत संस्कृत भाषा एकाच व्याकरणनियमावलीने बांधली गेली होती. विविध छंदांवर कवींचे प्रभुत्व होते, शब्दप्रभुत्व तर अलौकिक होते. त्यामुळे कुठेही शब्दांतील ऱ्हस्व-दीर्घांत त्यांना बदल करावा लागला नाही. तशी शास्त्राची परवानगीच नव्हती. असे असूनही रचनेतील सहजता रसिकास मोहित करी. संस्कृतात बरेच दीर्घ ईकारान्त स्त्रीलिंगी शब्द ऱ्हस्वान्तही आहेत. उदा. रजनी-नि, अवनी-नि, आवली-लि, कवीने हे बदल केलेले नाहीत.

एकंदरीत मराठी कवींच्या सोयीसाठी पद्यरचना करण्यासाठी व्याकरण वेगळे अर्थात गद्याहून. हा प्रकार संस्कृतात दिसत नाही. गद्याला आणि पद्याला एकच व्याकरण नियंत्रित करीत होते. वेदातील ऋचांच्या रचनेत दीर्घाचे ऱ्हस्व, तर ऱ्हस्वाचे दीर्घ केलेले आढळते, पण थोड्या ठिकाणी. 'यत्रा नर:=यत्र नर:

पण वैदिक रचनेचा प्रारंभकाल हा काव्यरचनेच्या प्रयोगशीलतेचा काल होता. या प्रयोगशीलतेतून सुधारित अशी मंत्ररचना झालेली आढळते. हे लक्षणीय आहे. अशा स्थितीत ऋषिकवींनी शब्दरूपे केवळ मंत्राच्या घडणीसाठी वाकवली नाहीत. ऋषींनी प्राचीन काळी रचनेसाठी मुक्त स्वातंत्र्य कधीच घेतले नाही. आर्ष महाकाव्यांत आर्षरूपे (म्हणजे फक्त ऋषींनी योजिलेली) आढळतात. पण त्यांचाही सातत्याने प्रयोग केलेला आढळत नाही.

मराठी कवींना मात्र काव्यरचना करताना कसरत करावी लागते, याचे आश्चर्य





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

वाटते. प्राचीन काव्य जरा बाजूला ठेवू. अर्वाचीन मराठी काव्यात हे कवींचे निरंकुशत्व सर्रासपणे चालत आलेले दिसते. त्याला शास्त्रमान्यता मिळाल्यासारखे झाले आहे. प्रतिष्ठित कवीही शब्दरचना करताना अगतिक बनतात. काही उदाहरणे याला साक्ष देतील. रे. टिळकांच्या 'केवढे हे क्रौर्य' या कवितेत 'क्षणोक्षणि पडे..., थोर बुद्धीबल, ...पद लांबवीले' केशवसुतांच्या 'सिंहावलोकन' कवितेत देखील कितीतरी ऱ्हस्व-दीर्घाचे प्रमाद दिसून येतील. प्रदेश किति, किती. स्मृतीस, पुढिल - इ. 'आम्हांला वगळा गतप्रभ झणी होतील तारांगणे' अशी निर्दोष छंदोरचना सर्वत्र का दिसू नये? मराठीत 'म्ह' या संयुक्त व्यंजनास सोयीनुसार संयुक्त समजतात. हेही मान्य करायला हरकत नाही. मराठी भाषेची प्रकृती जाणून आपण ती स्वीकारू. गोविंदाग्रजांच्या कवितेतही अशा प्रकारचे स्वातंत्र्य कवीने घेतलेले दिसते.

कविवर्य तांबे देखील 'काळेभोर विशाल केश रुळती, तीच्या नितंबावरी', 'नेत्र लागले पैलतिरी' अशा सुंदर रचनेत छंदाचा निर्दोषपणा पाळण्यासाठी ऱ्हस्व-दीर्घांत बदल करतातच. कविवर्य माधव जूलियन यांनी मराठी कवितेत कितीतरी अन्तर्बाह्य बदल घडवून आणले. त्यांच्या रचनेत बराच सफाईदारपणा दिसून येतो. 'विरहतरंग' या दृष्टीने पाहण्यासारखे आहे. त्यातही 'तूझ्या' (१४९), तूझी (१५४) अशी खटकणारी स्थळे दिसतातच. 'रानकिशोरी' या रम्य रचनेत 'कार्भारिण तू सुग्रण, तूझीच शिदोरी' या ओळीत सोयीनुसार वापरलेले शब्द श्रवणास खटकतातच. ते चमत्कारिक दिसतात. कविश्रेष्ठ कुसुमाग्रजांनी अशा प्रकारच्या शब्दयोजनेतील स्वैरतेला बराच लगाम घातलेला दिसतो. तरीदेखील काही ठिकाणी ऱ्हस्वाला, दीर्घत्व वा दीर्घाला ऱ्हस्वत्व दिलेले आढळते. कवी अनिलही 'परंतू' असे कवितेत लिहितात. अशी अनेक उदाहरणे अर्वाचीन काव्यात सापडतील. 'नाही' हे कवितेत 'नाहि' लिहिताना कवीस मुळीच संकोच वाटत नाही.

मराठी कवींचे हे निरंकुशत्व मान्यता पावले आहे, हे आश्चर्य! काव्यलेखनाचे नियम गद्यलेखनाहून अगदी वेगळे हे मराठीतच पाहावयास मिळते. हे सर्व छंदोरचनेच्या नियमपालनातून उद्‌भवले! संस्कृत भाषेने असे केले का? कालिदास भवभूतींच्या काव्यात अवघड वृत्ते योजूनही भाषेची शुचिता पाळलेली आढळते. मराठीला मात्र हा खास परवाना मिळाला. 'सांगावया कोण तुम्ही कवीला' असे प्रस्तुत लेखकास कोणी न विचारो, म्हणजे झाले? आमच्या कवींचे शब्दप्रभुत्व कमी आहे, हे मी मान्य करणार नाही. भाषेच्या शुचितेकडे लक्ष देऊन केलेली निर्दोष रचना मराठीत फारच अल्प दिसते.

**'समिधा' इंदिरानगर, नासिक ९**

■ ■



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मराठी अभ्यास परिषद

२

# कवींचं निरंकुशत्व : काही प्रतिक्रिया

अशोक केळकर

१) कृष्णशास्त्रींचा लेख मी वाचलेला नाही; माझी काही निरीक्षणं त्याही लेखाला लागू पडण्याची शक्यता आहे.

२) तुम्ही आर्षप्रयोग आणि व्याकरणदोष यांची गल्लत केलेली दिसते. झालिया, पाहोन, नाशु, करी अशा पुराण-रूपांचा प्रयोग हा आर्षप्रयोग, म्हणजे तो व्याकरणदोष (कुणी याला 'च्युतसंस्कृति' म्हणतात) नव्हे. एकनाथ पूर्वकाळात ते आर्षप्रयोग नसून, नित्याचे प्रयोग होते, असं दिसतं; नंतर ते कमीकमी होत नाहीसे होतात आणि वापरले गेलेच, तर त्यांना आर्षप्रयोगाचा archaism चा दर्जा प्राप्त होतो.

३) रीतिभूतकाळ आणि पुराण वर्तमानकाळ यांत अंतर आहे. करसि, करति ही रूपं वर्तमानकालाची, तर करस, करत ही रीतिभूतकाळाची (दामले, शास्त्रीय मराठी व्याकरण पाहावं.)

४) 'निरंकुशाः कवयः' ही लोकोक्ती संस्कृतमध्ये कवीला दोष देण्यासाठी उपरोधानं अशी वापरली जात होती, तशी कवीचं स्वातंत्र्य विद्वज्जड शास्त्रीमंडळींच्या काचाविरुद्ध जाहीर करण्यासाठी देखील वापरली जात असावी. किंबहुना तिचा उपरोधाने उपयोग करणं हा नंतरचा भाग असावा. संस्कृतमध्ये जाणत्या मंडळींना विचारायला पाहिजे. ते कसंही असो; पण ज्याअर्थी अशी लोकोक्ती प्रचारात आली आणि काव्यशास्त्रामध्ये काव्यगत व्याकरणदोष, शब्ददोष, छंदोदोष ही प्रकरणं येतात, त्या अर्थी संस्कृत काव्य त्यापासून जवळजवळ मुक्त होतं, हा तुमचा दावा चिंत्य वाटतो. अलौकिक कविकौशल्य नेहमीच दुर्मीळ असतं

५) आर्षमहाकाव्यात पुराणरूपं दिसतात, याची दोन कारणं दिसतात : ती काव्यं मूळची लोकवाङ्मयात्मक असल्यामुळे शास्त्राचा काच त्यांना नसावा; त्यांच्यामधल्या भाषेला अभिजात संस्कृत (पाणिनिनियत) न म्हणता संस्कृत भाषेचा इतिहास तपासणारी मंडळी लौकिक, popular संस्कृत म्हणतात. त्यांची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

उपलब्ध ग्रंथरूपं पाणिनीच्या नंतरच्या काळातली असली, तरी 'जय', 'भारत' ही अनुपलब्ध ग्रंथरूपं आणि कदाचित 'रामायणा'चा काही भाग पाणिनीच्या अगोदरच्या काळातली असणं शक्य आहे. म्हणजे आर्षकाव्यरचनेची स्थिती काही अंशी वेदमंत्ररचनेसारखी आहे.

६) व्याकरणदोषांपैकी नामाला लागलेला विभक्तिप्रत्यय लुप्त होणं हा व्याकरणदोष नाही. 'सामान्यरूप' म्हणतात, ती वास्तविक जुनी विभक्तीच आहे. (झूल ब्लॉकचा मराठी भाषेचा इतिहास पाहावा.) इतरत्रही हा प्रकार दिसतो : लोका सांगे ब्रह्मज्ञान..., देवा घरी, मुला हातीं. सर्वनामांच्या बाबतीत असं होतं (मज, तुज, - मला, तुला ऐवजी). हिंदीमध्ये सामान्य रूपाला विकृत रूप म्हणतात : त्याचे काही प्रयोग : तेरी बुद्धि ठिकाने नहीं, वह कलकत्ते गया, इन दिनों हर चीज महँगी है. एक किनारे हो जाओ. थोडक्यात हा व्याकरणदोष नसून आर्षप्रयोग आहे.

७) काही संस्कृत कवींच्या रचनेत सहजता आहे, यात वाद नाही. पण बऱ्याच कवींच्या रचनेत ती नाही, त्यांतले पुष्कळसे त्यामुळे मागे पडले. त्याचं काय?

८) व्याकरणदोषांतही वाक्यरचनेतील दोष, पदरचनेतील दोष, आणि शब्दरूपातील दोष (ऱ्हस्व स्वराऐवजी दीर्घ स्वर वा उलट 'कार्भारिण' मधील 'र्' नंतरच्या 'अ' चा लोप, 'म्ह' 'ऱ्या' सारख्या जोडाक्षरांच्या आधीचं अक्षर 'लघु' न ठेवता 'गुरु' ठेवणं, इ.) वेगवेगळे गणायला पाहिजेत. तुमचा मुख्य रोख (आणि रोषही) या तिसऱ्या प्रकारच्या दोषांवर दिसतो; काव्यरचनेतील दोषांचं किंवा समास, तद्धित, इत्यादी पदरचनेतील दोषांचं तुम्ही एकही उदाहरण दिलेलं नाही.

म्हणे हंस क्षोणी-पतिस तुज कोणी सम नसे
जादूनेच तुझ्या बा रे। वन नंदन बनले सारे।

(ही दोन उदाहरणं मो. स. मोने यांच्या मराठी साहित्य व व्याकरण या पुस्तकातली.) वास्तविक चिपळूणकरांचा निबंध आज सहजी उपलब्ध नाही. त्यात उक्त-दुरुक्त-अनुक्त बरेच आहे; या लेखाच्या निमित्ताने तुम्ही कवितेतील आर्षप्रयोग, व्याकरणदोष आणि शब्ददोष यांना एक सोदाहरण आढावाच घेतला असता, तर बरं झालं असतं. (अजूनही ते करता येईल.)

९) मराठी कवींना मात्र छंदोबद्ध रचना करताना कसरत का करावी लागते, हा प्रश्न तुम्ही उपस्थित केला आहे खरा. पण त्याचं काही उत्तर शोधण्याचा सुचवण्याचा प्रयत्न कुठे आहे? या संबंधांत काही निरीक्षणं नोंदवतो. (क) संस्कृत कवींचं रेकॉर्ड इतकं खराब नाही, हा तुमचा दावा मान्य होण्याजोगा आहे. पण व्याकरण, छंदोरचना सांभाळण्याची त्यांनी काही किंमत तर मोजलेली नाही? (ख) संस्कृत भाषेत यमक नाही, पण अर्वाचीन भारतीय आर्य भाषांमध्ये ते विपुल. संस्कृत भाषेत पदक्रम शिथिल, पण मराठी, इत्यादी भागातून तो तितका शिथिल नाही.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

अशा गोष्टींचा तुमच्या प्रश्नाशी संबंध असावा. (ग) मराठी अक्षरगणवृत्तांपेक्षा जाति आणि अक्षरवृत्ते अधिक प्रिय, आधुनिक कवींनी तर मुक्त पद्याचा मोठ्या प्रमाणात आश्रय घेतलेला, संस्कृतमधील पद्यरचनाप्रकारांचा तौलनिक प्रसार वेगळ्या प्रकारचा - या गोष्टींचाही विचार व्हायला हवा. (घ) मराठीप्रमाणेच हिंदीची स्थिती असावी. कामताप्रसाद गुरू यांच्या हिंदी व्याकरणाची 'कविताकी भाषा', 'काव्यस्वतंत्रता' ही परिशिष्टं पाहावीत (हिंदीमध्ये अक्षरगणवृत्तांचा प्रचार, मराठीपेक्षा खूपच कमी दिसतो, हेही लक्षणीय. अशा प्रश्नांचा शोध घेताना मराठीची तुलना केवळ संस्कृतशी करणं पुरेसं नाही. प्राकृत आणि हिंदी, गुजराती, कोकणी, या संलग्न भाषांचाही विचार करायला हवा. कदाचित तूर्त सध्या केवळ सोदाहरण आढावा आणि नंतर सावकाशीने केव्हातरी कार्य-कारण-चिकित्सा असे दोन लेख करता येतील.

७, धनंजय, ७५९/८३, भांडारकर रस्ता गल्ली, पुणे ४११ ०४

■ ■

३

# मराठी इंग्रजी संयुक्त पेपर

शर्मिष्ठा खेर

मराठी वाचवायची तरी कशी, असा अतिशय कळकळीचा प्रश्न करणारा एक परिसंवाद नुकताच पुण्यात दै. 'सकाळ'च्यातर्फे झाला. त्यावेळी काही उपाय सुचवले गेले. त्यात माझ्यासारख्यांना सुचणारा मुद्दा कोणाच्याच विचारात नसल्याचं दिसलं. तो मुद्दा असा :

शास्त्र, वाणिज्य आणि कला यांपैकी कुठल्याही शाखेतील पदवीसाठी आपल्या सर्व विद्यापीठांमध्ये इंग्रजी विषय अनिवार्य आहे. पदवीधरांना इंग्रजी खरोखरी किती येतं, हा भाग अलाहिदा असला, तरी विषयाला आणि भाषेला प्रतिष्ठा आहे, एवढं खरं. तर हा शंभर गुणांचा पेपर मराठी आणि इंग्रजी असा प्रत्येकी पन्नास गुणांचा संयुक्त पेपर करावा. इंग्रजीचे बहुतेक प्राध्यापक मराठी शिकवू शकतीलच. काही अमराठी प्राध्यापकांच्या बाबतीत वर्क-लोडचा प्रश्न उभा राहत असल्यास तो विभागांतर्गत तडजोडींनी सोडवता येईल. पण मराठीची प्रतिष्ठा तात्काळ उंचावेल.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

उच्च शिक्षितांना मराठी यावेच लागेल आणि नंतर सामाजिक व्यवहारामध्ये मराठी येत नसल्याची भूमिका घेण्याची सोय राहणार नाही.

मात्र या पेपरमध्ये जेमतेम मार्क मिळवून पास होण्याची सोय नसावी. (खरं तर, ती कुठेच नसावी.) या पेपरमध्ये प्रत्येक विभागात किमान पंचवीस आणि एकूण किमान पन्नास टक्के मार्क आवश्यक ठेवावेत. किंबहुना पदवीची श्रेणी ठरविण्यासाठी हे गुणही विचारात घ्यावेत. म्हणजे भाषांच्या अध्ययन-अध्यापनाचा दर्जा उंचावर राहील.

जर्मन विभाग, फर्गसन महाविद्यालय, पुणे (जर्मन विभाग)

■ ■

संस्कृत व्याकरणाच्या मुनित्रयामध्ये महाभाष्यकार पतंजली यांचे नाव सर्वज्ञात आहे. ते शेषाचे अवतार मानले जातात. ते आपल्या मूळ रूपात शिष्यांना महाभाष्य शिकवत असत. पण शिष्य आपल्या तेजाने दिपून जाऊ नयेत म्हणून ते पडद्याआड बसून महाभाष्य शिकवीत. शिष्यांच्या वेगवेगळ्या शंकांना आपल्या अनेक मुखांनी एकदम उत्तरे देत. त्यामुळे शिष्यांचे कुतूहल वाढून त्यांनी पडदा दूर सारला. पण पतंजलींच्या तेजाने ते सर्व शिष्य एकदम भस्मसात् झाले. एक शिष्य त्यावेळी तिथे नव्हता, तो तेवढा वाचला. पतंजलींनी त्यालाच मग सर्व महाभाष्य शिकवले. पण त्याने योग्य पावित्र्य न राखल्याने पतंजलींनी त्याला 'तू ब्रह्मराक्षस होशील' असा शाप दिला. तेव्हा तो गयावया करू लागला. तेव्हा पतंजलींनी त्याला उःशाप दिला. 'तुझ्याकडे व्याकरण शिकायला येणाऱ्या शिष्यांना तू 'पच्' धातूचे निष्ठान्त रूप विचार. जो योग्य उत्तर देईल त्याला महाभाष्य शिकव. म्हणजे तुझी ब्रह्मराक्षसाच्या योनीतून सुटका होईल.' निष्ठान्त रूप म्हणजे कर्मणि भूतकालवाचक धातुसाधित विशेषण होय. त्याप्रमाणे तो ब्रह्मराक्षस आपल्याकडे येणाऱ्या सर्व शिष्यांना तो प्रश्न विचारत राहिला. पण कुणाचेही उत्तर बरोबर आले नाही. शेवटी पतंजलींनाच त्याची कीव येऊन त्यांनी ब्राह्मणकुलात जन्म घेतला. त्या जन्मात त्यांचे नाव चंद्रगुप्त होते. चंद्रगुप्ताने त्या ब्रह्मराक्षसाच्या प्रश्नाचे अचूक उत्तर दिले. 'पच्' धातूचे निष्ठान्त रूप 'पक्व' असे होते. संस्कृतमधील २००० धातूंमध्ये एकट्या 'पच्' धातूचेच रूप असे 'व' कारान्त होते. म्हणून पाणिनीला त्यासाठी स्वतंत्र सूत्र रचावे लागले आहे. पुढे ब्रह्मराक्षसाने चंद्रगुप्ताला महाभाष्य पढविले व तो शापातून मुक्त झाला. या चंद्रगुप्ताचा मुलगा भर्तृहरी यानेही पुढे महाभाष्य शिकून त्यावर अनेक ग्रंथ लिहिले आणि परंपरा वाढविली.

□

**(श्री. वा. बा. भागवत यांच्या 'पाणिनीय व्याकरण आणि भाषा तत्त्वज्ञान' या ग्रंथातून थोडाफार संस्कार करून. पृ. ३५-३७)**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# वेद आणि मुठीत ?

माधवी कोल्हटकर

'मुठीत ठेवणे' हा मराठीतला एक वाक्प्रचार. त्याच्याशीच संबंधित आणखी एक म्हणजे 'मुठीत असणे.' मोल्जवर्थने या वाक्प्रचाराचा अर्थ to be under the thumb of असा दिला आहे, म्हणजे 'वर्चस्वाखाली असणे.' 'एका मुठीची माणसं' या आणखी एका वाक्प्रचारातूनही मूठ याचा बळ, वर्चस्व किंवा नियंत्रण असा अर्थ व्यक्त होतो. या वाक्प्रचाराचा मराठी भाषेतला वापर मुख्यतः 'तिने नवऱ्याला अगदी मुठीत ठेवले आहे', असा आढळतो. यामुळे वरकरणी अनेकांना याचा उगम फ्राईडच्या मानसशास्त्रीय उपपत्तीत आहे, असे वाटते खरे, पण ते तसे नसावे. कारण हा वाक्प्रचार फक्त मराठीतच आहे असे नाही. बंगाली, कन्नड, ओरिया, गुजराती, हिंदी अशा इतर भारतीय भाषांतही तो आढळून येतो. या भाषांतही बायकोने नवऱ्याला मुठीत ठेवले आहे, असा प्रयोग आढळतोच. याखेरीज राजा मंत्र्यांच्या अगदी मुठीत आहे किंवा मुखिया काही विशिष्ट गावकऱ्यांच्या मुठीत आहे, असेही वाक्प्रयोग आढळतात. म्हणजेच सर्वसाधारणपणे लोकांना ज्याचे इतरांवर वर्चस्व असायला हवे, असे वाटत असते, तोच जर इतरांच्या नियंत्रणाखाली असला, तर हा वाक्प्रचार वापरला जातो, असे दिसते. थोडक्यात म्हणजे, अनुकूल अभिप्रायाने हा निश्चितच वापरला जात नाही.

इंग्रजीमध्ये तरी मला मूठ या शब्दाचा अशा अर्थाने वापर केलेला आढळला नाही. जर्मनमध्ये एका वेगळ्या वाक्प्रचारात तो आढळतो. मराठीत जसे आपण मी माझ्या पायांवर उभा आहे, असे म्हणतो, तसा जर्मनमध्ये auf eigene Faust असा वाक्प्रयोग आहे. पण बाकी कुठे आढळत नसला, तरी थेट वेदांत मात्र आपल्याला असाच्या असा वाक्प्रचार आढळून येतो.

सोमयज्ञात यज्ञाला सुरुवात करण्यासाठी यजमान दीक्षाग्रहण करतो. दीक्षेचा भाग म्हणून तो केस, मिशा, नखे कापतो, स्नान करतो. कृष्णाजिन हेच उत्तरीय म्हणून वापरतो. त्याचप्रमाणे आहारावर नियंत्रण, सत्यवचन या गोष्टीसुद्धा दीक्षेतील



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मराठी अभ्यास परिषद

व्रते म्हणून त्याने स्वीकारायच्या असतात. तसेच मुठी वळणे हाही एक दीक्षाग्रहणाचाच भाग म्हणून सांगितलेला आहे. (नंतर अवांतरदीक्षेत मिटलेल्या मुठी आणखी घट्ट बंद कराव्यात, असे म्हटले आहे. संतरां मुष्टी कुरुते, हिरण्यकेशिश्रौतसूत्र १०.३.३४; भारद्वाजश्रौतसूत्र १२.२.४) वैखानसश्रौतसूत्र १२.२४.१ आणि वैतानश्रौतसूत्र ११.२३.२४ या ठिकाणी नुसताच तो मुठी वळतो, असा संदर्भ येतो, तर इतर काही ठिकाणी कुठला मंत्र म्हणून मुठी कशा वळाव्यात, हेही सांगितले आहे. 'स्वाहा यज्ञं मनसा स्वाहा द्यावापृथिवीभ्यां स्वाहोरोरन्त रिक्षात्स्वाहा यज्ञं वातादारभे' (तैत्तिरीयसंहिता १.२.२.३) या मंत्राच्या पठणाबरोबर दोन्ही हातांची बोटे क्रमाने मुडपत तो मूठ मिटतो. आपस्तंबश्रौतसूत्रात म्हटले आहे (१०.११.३-४) अथाङ्गुलीर्न्यञ्चति । स्वाहा यज्ञं मनसा इति द्वे । स्वाहा पृथिव्या इति द्वे । स्वाहोरोरन्त रिक्षादिति द्वे । स्वाहा यज्ञं वातादारभ इति मुष्टीकरोति । अर्थात् मग यजमान 'स्वाहा यज्ञं मनसा' या मंत्रभागाच्या पठनाबरोबर दोन बोटे मुडपतो. 'स्वाहा पृथिव्या' या भागाबरोबर दोन, 'स्वाहोरोरन्तरिक्षात्' या भागाबरोबर दोन आणि 'स्वाहा यज्ञं वातादारभे' हा भाग म्हटल्यावर संपूर्ण मूठ मिटतो. मुठी वळण्याचे कारण तैत्तिरीयसंहितेत (५.२.१७) दिले आहे, ते असे : 'मुष्टीकरोति वाचं यच्छति यज्ञस्य धृत्यै' म्हणजे 'तो मुठी वळतो, मौन पाळतो. ते यज्ञाच्या धारणेसाठी किंवा दृढतेसाठी.' इतर कोणत्या ग्रंथात यापेक्षा काही वेगळे स्पष्टीकरण दिलेले आढळत नाही. अपवाद फक्त ऐतरेय ब्राह्मणाचा.

ऐतरेय ब्राह्मणाची सुरुवातच मुळी सोमयज्ञाने आणि त्यासाठी यजमानाने घ्यायच्या दीक्षेने होते. दीक्षिताची व्रते सांगताना तिथे म्हटले आहे - 'दीक्षितः... मुष्टी कुरुते । मुष्टी वै कृत्वा गर्भोऽन्तः शेते । मुष्टी कृत्वा कुमारो जायते । तद्यन्मुष्टी कुरुते यज्ञं चैव तत्सर्वाश्च देवता मुष्टयोः कुरुते । तदाहुर्न पूर्वदीक्षिणः संसवोऽस्ति परिगृहीतो वा एतस्य यज्ञः परिगृहीता देवता नैतस्यार्तिरस्त्यपरदीक्षिण एव यथा तथेति ।' (ऐतरेयब्राह्मण १.३)

बापटशास्त्रींनी याचा मराठीत असा अनुवाद केला आहे : 'नंतर यजमान आपल्या मुठी वळतो. कारण मुठी वळून गर्भ गर्भाशयात शयन करतो व मुठी वळलेल्या असतानाच कुमार जन्माला येतो. यजमान मुठी वळतो, याचे कारण यज्ञ व सर्व देवता त्याने आपल्या मुठीत आणून ठेवलेल्या असतात. कोणी ब्रह्मचारी असे म्हणतात, की दुसऱ्याच्या अगोदर दीक्षा केलेल्या यजमानाला संसव नामक दोष लागत नाही. कारण यज्ञ व सर्व देवता त्याने आपल्या मुठीत अगोदरच परिगृहीत केलेल्या असतात.'

- आणि इथेच आपल्याला या वाक्प्रचाराचा उगम दिसतो. खरे तर, यजमानापेक्षा यज्ञ आणि यज्ञीय देवता कितीतरी श्रेष्ठ, कितीतरी सामर्थ्यवान्; पण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

यायोगे इतक्या प्रभावी देवतांना यजमान आपल्या मुठीत म्हणजे वर्चस्वाखाली बंदिवान करून ठेवतो, आपल्या नियंत्रणाखाली ठेवतो. त्या तिथून दुसरीकडे जाऊ शकत नाहीत.

मुष्टिकरण हा विधी, खरे तर सर्व ग्रंथकारांनी सांगितलेला आहे. पण त्याचे असे स्पष्टीकरण मात्र इतरत्र कोठेही आढळत नाही. याचे एक कारण असे असू शकेल - यज्ञात संसव नावाचा एक दोष निर्माण होण्याची शक्यता असते. संसव म्हणजे एकाच वेळी दोन यजमानांनी सोमयज्ञ चालू करणे. असे झाले, तर अर्थातच जो आधी सुरू करतो त्याच्याकडे देवता आधीच गेलेल्या असतात. त्यामुळे नंतर दीक्षा घेणाऱ्या यजमानाला हा संसवदोष लागतो. असा दोष निर्माणच होऊ नये, देवतांना आधीच वश करून घेतलेले असावे, यासाठी ऐतरेय ब्राह्मणाने मुष्टिकरण हा विधी सांगितलेला आहे. पण इतर कुठल्याही ग्रंथाने संसवाचा विचार दीक्षेच्या संदर्भात केलेला नाही किंवा मुष्टिकरणाचा विधी संसवदोष निर्माण होऊ नये, यासाठी घ्यायच्या काळजीशी जोडलेला नाही. तिथे संसवाचा विचार केलेला आहे, तो प्रायश्चित्तांच्या संदर्भात. संसवदोष झालाच असेल, तर काय प्रायश्चित्ते घ्यावीत, अशी चर्चा तिथे केलेली आहे. आश्चर्य म्हणजे, नंतरच्या अभिजात वाङ्मयातही हा वाक्प्रयोग आपल्याला अजिबात आढळत नाही, पण तद्भव भाषांमध्ये मात्र सापडतो. याचे कारण काय असावे, हेही लक्षात येत नाही.

यावरून एक गोष्ट मात्र स्पष्ट होते आणि ती पुन्हापुन्हा सांगावीशी वाटते, की भारतीय भाषांच्या सांग आणि सखोल आकलनासाठी संस्कृतच्या अभ्यासाची पार्श्वभूमी आवश्यकच नाही, तर अनिवार्य आहे; आणि तो करताना वैदिक भाषेकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.

**संस्कृत कोश प्रकल्प, डेक्कन कॉलेज, पुणे ४११००६**

■ ■



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# काही कन्नड उच्चारप्रवृत्ती

विजया तेलंग

'ए' चा उच्चार 'ये' असा करण्याची कन्नड प्रवृत्ती मागे एकदा नोंदवलेली आहे.[१] आणि मराठीतही त्या प्रकारची ही उदाहरणे कशी आढळतात, याचीही चर्चा केली आहे. परंतु कन्नडेतर शब्दातील 'ए' हा 'ये' ['य'] कसा होतो हे इंग्रजी उदाहरणांवरून येथे दाखवायचे आहे.

इंग्रजी वर्णमालेतील 'ए' सामान्यतः 'ए' च उच्चारला जातो. 'ये' बी, सी, डी' असे क्वचितच आढळेल. पण पुढे मात्र येफ् (यफ्), येच् (यच), येल् (यल), येम् (यम्), येन (यन्), येस् (यस्), येक्स (यक्स) असे स्पष्ट-अस्पष्ट ये/य युक्त उच्चार करण्याची प्रवृत्ती बऱ्याच कन्नड भाषकांत दिसते. ती त्यांच्या मूळ भाषेच्या विशिष्ट उच्चार-प्रवृत्तीशी सुसंगत आहे. म्हणून अपरिहार्यही आहे.

परंतु इंग्रजी वर्णात नसलेला 'ये/य' उच्चार विनोदाला सुद्धा कारणीभूत होतो. 'एस्. एस्. वोडेयर, हे कर्नाटकातील एक मोठे आदरणीय नाव. पण ते येस्. येस्. किंवा 'यस्. यस्' असे उच्चारले गेले, तर त्यातून कदाचित त्यांचा 'सौम्य' पणा व्यक्त होईल. पण 'होयबा' असा अर्थ निष्कारण चिकटेल.

इंग्रजी 'एच' चा आणखी एक कन्नड उच्चार बंगलोर दूरदर्शनने जवळजवळ रूढ केला आहे. तो आहे 'हेच्'. 'हेच्. डी. देवेगौडा', हेच्. के. पाटील अशा नामोच्चारांतून तो आता सरकारमान्य बनला आहे. प्रथेनुसार तो लोकमान्यही होईल. वृत्तपत्रातही 'हेच्' आढळतो.

'एच्' ऐवजी 'हेच्' म्हणणे ही चूक आहे. कोणी ती निदर्शनाला आणू नये. दुरुस्त करू नये आणि ही चुक पुढे चालूच राहावी, ही अनर्थपरंपरा आहे. चुकीचे संभाव्य कारण शोधण्यासारखे आहे.

महाप्राण ('ह') नको तेथे वापरणे आणि पाहिजे तेथे टाळणे (अर्थात ही अन्य भाषकांची धारणा - कन्नड भाषकांची नव्हे) ही एक कन्नडची लकब आहे. महाप्राणाची उलटापालट करणे हाही असाच एक प्रकार आहे. पेढे-फेडे मध्ये



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

मराठी भाषकाला नको वाटणारा महाप्राण 'पे' मध्ये नाही. आणि पाहिजे वाटणारा महाप्राण 'डे' मध्ये नाही. बंगलोरमध्ये 'भात' मागितला तर 'बाथ' मिळण्याची शक्यता अधिक असते. 'भारत' चा 'बारत' हा उच्चा महाप्राण टाळण्याच्या प्रवृत्तीचाच द्योतक आहे.

'हेच्' हा उच्चार महाप्राणविषयक कन्नड लकबीतून नको तेथे 'ह' कार आलेला असावा. हा 'हा'कार म्हणजे काही हाहाकार नव्हे. पण आचारसंहितेच्या अतिरेकी घोषणांच्या काळात 'उच्चारसंहिता' मानणे आणि पाळणे भाषाव्यवहारात महत्त्वाचे ठरावे. 'ए' हा उच्चार केवळ इंग्रजीच असता आणि तो कन्नडला सर्वस्वी नवा असता तर महाप्राणाची जोड देऊन तो 'हेच' बनवून स्वीकारणे आणि वापरणे योग्य नव्हते. तर अटळही क्षम्य ठरले असते.

इंग्रजीतील 'ॲ' किंवा 'ऑ' भारतीय भाषांत नाहीत (बंगालीचा(?) काहीसा अपवाद) त्यामुळे 'ॲ' ऐवजी 'एक' हा उच्चार करून जेव्हा एखादा गुजराती भाषक 'स्नेक्स' (स्नॅक्स) खाल्ल्याचे सांगतो. तेव्हा आपण थक्क होतो. त्या मानाने 'आ' चा 'ओ' होऊन आलेले 'कोलेज' ('कॉलेज') आपल्याला चालू शकते. तरीही 'ऑ' 'ओ' हे किंवा यासारखे परभाषातील उच्चार आपण(ही) करू शकतो. आपल्या लिपीत बद्ध करू शकतो. आणि अन्य 'ए' कार युक्त वर्णाचा 'एच्' चा कन्नड पद्धतीने होणारा उच्चार काही कारणपरंपरा सुचवत असला, तरीही इंग्रजीतील ते उच्चार जसेच्या तसे बोलण्या-लिहिण्यात यावे ही अभिजातता आहे. ती नाकारणे म्हणजे समृद्धीची दारे बंद करण्यासारखे आहे.

**टीप :**

१. डॉ. पंडित आवळीकर / डॉ. विजया तेलंग 'देशीकार लेणे' काही अर्थ आणि उच्चार, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ऑक्टोबर-डिसेंबर १९९३, पृ. १३७-३८.

**मराठी विभाग, गुलबर्गा विश्वविद्यालय, गुलबर्गा ५८५१०६**





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# भाषांतर

मूळ रुमेनिअम कवी Marin Sorescu. मराठी भाषांतरकार : **मिलिंद मालशे**

I was sitting an exam
In a dead language
And I had to tranlsate myself
From man into ape

I played it cool,
First translating a text
From a forest.

But the translation got harder
As I draw nearer to myself.
With some effort
I found, however, satisfactory equivalences
For nails and the hair on the feet.

Around the knees
I started to stammer.
Towards the heart my hand began to shake
And blotted the paper with light.

Still, I tried to patch it up
With the hair of the chest,
But utterly failed
At the soul.

मी बसत होतो परीक्षेला
एका मृत भाषेत
आणि लागलं करावं मला
स्वत:चंच भाषांतर
माणसातून माकडात.

हे काहीच विशेष नाही, अशा थाटात
मी शांत डोक्यानं
प्रथम जंगलातून
एका संहितेचं भाषांतर करायला घेतलं

पण जसा स्वत:कडे सरकायला लागलो,
तसं भाषांतर होत गेलं कठीण.
तसे थोडे कष्ट घेतल्यावर
नखांना नि पायांवरच्या केसांना
मिळाले बरे शब्द.

जसा गुडघ्यांपर्यंत आलो,
तसा चाचरायला लागलो.
हृदयापाशी आलो, तोवर
हात कापायला लागले
नि प्रकाशाने कागद डागाळू लागले.

छातीच्या केसांनी झाकून टाकायला
मी खूप पाहिलं,
पण आत्म्याच्या बाबतीत
मात्र सपशेल नापास झालो.

**(जॉज स्टायनर यांच्या After Babel : Aspects of Language and Translation, Oxford : OUP, 1975 या ग्रंथामध्ये आधुनिक रुमेनिअन कवी Marin Sorescu यांच्या कवितेचे टी. क्रिब यांनी इंग्लिशमध्ये केलेले भाषांतर उद्धृत केलेले आहे. (पृ. २४२) इंग्लिशवरून मराठी भाषांतर मिलिंद मालशे यांनी केले आहे.)**

**सी १२९, सेंट्रल एरिया, आय्. आय्. टी, पवई मुंबई ४०००७६** ■ ■



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मराठी अभ्यास परिषद

# पाणिनीची मातृभाषा : काही उत्तरांचा शोध

शैलेश सदाशिव पुंडलीक

**प्रास्ताविक**

'पाणिनीची मातृभाषा : काही उत्तरांचा शोध' हा माझा लेख प्रा. मा. मु. देशपांडे यांच्या 'संस्कृत आणि प्राकृत भाषा' या ग्रंथाचा मागोवा घेत लिहिलेला असला, तरी तो त्या ग्रंथाचे परीक्षण नव्हे. कारण संस्कृत भाषा आणि तिचे व्याकरण यांचा माझा अभ्यास अत्यल्प आहे.

या लेखाच्या सुरुवातीस मी प्रा. देशपांड्यांच्या ग्रंथाचा परिचय करून देणे इष्ट ठरले असते; पण तसे मी केले नाही याची दोन कारणे : एक म्हणजे, या विद्वन्मान्य ग्रंथाची सर्वांनाच माहिती आहे, असे मी गृहीत धरलेले आहे. पण दुसरे म्हणजे, यदाकदाचित काहींना हा ग्रंथ उपलब्ध झाला नसेल, तर निदान 'भाषा आणि जीवन' च्या वाचकांना प्रा. सरोजा भाटे यांनी केलेल्या परीक्षणात त्याचा विस्तृत, उत्कृष्ट परिचय होईल. (वर्ष १४, अंक ४, दिवाळी १९९६, पृ. ६६ ते ७४) तेव्हा वाचकांनी मला क्षमा करावी.

प्रास्ताविकातील शेवटचे-म्हणजे श्रीमती भाटे यांच्या अनेक मतांशी मी सहमत आहे. विशेषत: पाणिनीच्या व्याकरणाबद्दल त्या जो वर्णनवादी अभ्युपगम मानतात, तो मला योग्य वाटतो. (पृ. ७४) तथापि तत्कालीन ब्राह्मण स्त्रिया संस्कृत बोलण्याचा 'बोबडा' प्रयत्न करीत असाव्या (पृ. ६९) असे जे त्यांना वाटते, ते मात्र मला बरोबर वाटत नाही. कारण भाषाविज्ञानाच्या दृष्टिकोणातून सर्वच भाषा या शिकायला तितक्याच प्रमाणात अवघड / सोप्या असतात. संस्कृत अवघड, म्हणून ती फक्त उच्चवर्णीय पुरुषांनी बोलावी आणि प्राकृत सोपी, म्हणून ती इतरांनी विशेषत: स्त्रियांनी बोलावी, असे म्हणणे अशा प्रकारच्या पुरुषी अहंकाराला इंग्रजीत एक समर्पक वाक्प्रचार वापरला जातो (तो मात्र मी इथे नोंदवत नाही, कारण तो सर्वांनाच माहीत आहे). तत्कालीन संस्कृत बोलणाऱ्या स्त्रिया, थोड्या फरकाने, पण पुरुषांइतक्याच सफाईने संस्कृत बोलत असल्या पाहिजेत. आजच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

स्त्रियाही काही फरकाने तितक्याच सफाईने संस्कृत बोलू शकतात, असे माझे मत आहे.

'संस्कृत आणि प्राकृत भाषा' या आपल्या विद्वन्मान्य ग्रंथात प्रा. माधव देशपांडे यांनी गमतीने स्वत:ला टिळक महाराष्ट्र विद्यापीठ ऊर्फ 'भुतांचा वाडा' यात वास्तव्य करणाऱ्या भुतांपैकीच एक असे म्हटले आहे. त्यांचा व्यासंग, निरलस संशोधन, निरपवाद विनयी वृत्ती, इ. सर्वांचा विचार करता, त्यांना 'महाभूत' म्हणायला हरकत नाही असे मला वाटते. या महाभूताची अनेक विषयांवरची उच्छ्वसिते त्यांच्या ग्रंथात आढळतात. त्यांतील फारच थोड्या विषयांचा मी इथे विचार करणार आहे आणि सुगमतेसाठी शक्यतोवर त्यांचीच परिभाषा, त्यांनीच दिलेले पुरावे, इत्यादींचा वापर करणार आहे.

पारंपरिक पद्धतीने विचार करणारे हिंदू मन, भाषा, धर्म, इत्यादींच्या अपरिवर्तनीयतेवर, नित्यत्वावर विश्वास ठेवते, यावर देशपांड्यांचा आक्षेप आहे. भाषेला आदी, अंत, इतिहास आहे, असे मानले तर पाणिनीच्या व्याकरणात धूसर वाटणाऱ्या काही भागांचा उलगडा होतो - पाणिनीला स्वकालिक भाषा उत्तम सांगता येते याविरुद्ध वैदिक भाषेचे स्पष्टीकरण देताना तोही अडखळतो, हे समजू शकते, असे त्यांचे म्हणणे आहे. अशा मानवी पाणिनीला भगवान म्हणून देवत्व द्यायचे आणि मग त्याच्या सूत्रांची ओढाताण करीत त्यांचा अर्थ लावायचा, याला त्यांचा विरोध आहे आणि तो स्तुत्य आहे. पण अपरिवर्तनीयतेवर श्रद्धा ठेवणारे आणि पाणिनीला प्रमाण मानणारे व्याकरणकारच त्याच्यावर वेळोवेळी परखड टीका करतात, हे स्वत: देशपांड्यांनीच अनेक ठिकाणी (पृ. ४८, कात्यायन, पृ. ९.४९, पतंजली, पृ. ११, नागेशभट्ट) नोंदवलेले आहे. शिवाय अग्नी बर्फाप्रमाणे थंड आहे इ.इ. असे वेदात सांगितले, तरी ते आम्ही मानणार नाही, कारण ते आमच्या अनुभवाच्या विरुद्ध आहे, असे स्पष्टपणे म्हणणारे शंकर तर सर्वपरिचितच आहेत. तेव्हा पाणिनीलाच काय, कुणालाही भगवान म्हणत त्याची अंधळी व्यक्तिपूजा करण्याची पद्धत भारतात कधीही नव्हती, हे सिद्ध होते. शास्त्रज्ञ म्हणून चर्चा करताना आपल्या गुरूचे दोषही सांगावे, पण त्याच्या अचाट बुद्धिवैभवासंबंधी आदर दाखवताना त्याला भगवान म्हणावे, यात अंतर्विरोध नाही. एकच मनुष्य दोन वेगवेगळ्या संदर्भांत वेगवेगळे बोलू शकतो, हे तत्त्व प्रा. देशपांड्यांनी पृ. ११ वर आधीच मान्य केलेले आहे. ते स्वत:सुद्धा त्याप्रमाणे वागतात. त्यामुळे परंपरेला काही बाधा येत नाही. मैत्रेयरक्षिताने पतंजलीला पाणिनीपेक्षाही जास्त प्रमाणं मानणे (पण नंतरच्या व्याकरणकारांना तितका मान न देणे) याचे कारण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

असे असावे, की प्रत्यक्ष अनुभवाने व्याकरण सिद्ध करण्यासाठी ज्यांना त्या भाषेचे आदर्श भाषक (model speakers) उपलब्ध होते, अशांमध्ये पतंजली हा सर्वश्रेष्ठ आणि बहुधा शेवटचाच असावा. पण पतंजलीबद्दल एवढी श्रद्धा दाखवतानाही पाणिनीबद्दल कोणी कमी श्रद्धाभाव दाखवत नाही, हेही लक्षात घेण्यासारखे आहे.

दुसरे म्हणजे भाषा ही अनादीच असते. हे आधुनिक भाषाशास्त्रही मान्य करते. अमुक एका काळात मानव जन्माला आला आणि त्यानंतर काही काळाने त्याने भाषा वापरायला सुरूवात केली, असे म्हणणे कोणीही मान्य करणार नाही. देशपांड्यांनी अभ्यासासाठी घेतला आहे. तो काही आधी ठरवून घेतलेल्या कालखंडातील संस्कृतचा अवतार आहे एवढेच. त्यात काही गैर नाही. सर्वच शास्त्रज्ञांना ते करावे लागते. पण त्याचा अर्थ त्या कालखंडाच्या आधी ती भाषा म्हणजे संस्कृत अस्तित्वात नव्हती, असा होत नाही. पाणिनी त्या भाषेची सर्वसाधारण व्यवस्था किंवा सोस्यूर यांच्या भाषेत (langue सांगण्याचा प्रयत्न करत आहे. त्यामुळे तो भाषेच्या कालबद्धतेचा विचार करीत नाही, एवढेच.

आता संस्कृत ही कुणाची मातृभाषा होती, की नाही, यावर मतभेद आहेत. संस्कृत आणि संस्कृतिप्रेमी संशोधकांना ती सर्वांचीच मातृभाषा होते, असे वाटते, तर काहींच्या मते ती कुणाचीच मातृभाषा नव्हती (पाहा पृ. ७२-७३) ही मते बहुतांशी भावनाप्रवण आहेत. त्यांच्यांतील अनेकांचे निराकरणही झालेले आहे. शास्त्रीय दृष्टीने पाहता सत्य या दोन अतिरेकी मतांच्यामध्ये सापडेल. त्याची इथे चर्चा करू. पाणिनीचे व्याकरण हे लोकांनी कसे बोलावे हे सांगणारे आदर्शवादी शास्त्र आहे, लोक प्रत्यक्षात कसे बोलत होते, हे सांगण्याचा उद्देश नाही, असे देशपांडे म्हणतात (पृ. ७७-७८), ते अर्धसत्य आहे. कोणतेही आदर्शवादी व्याकरण हे एखाद्या प्रमाणभाषेचे वर्णन असल्यामुळे ते प्रथम निदान काही चांगले बोलणारे लोक प्रत्यक्षात काय बोलतात, हेच सांगते आणि इतरांनी त्यांचे अनुकरण करावे, असा उपदेश करते. देशपांड्यांनी आधारासाठी उद्धृत केलेला पतंजली हा तर प्रत्यक्ष अनुभवावरच विश्वास ठेवणारा empirical व्याकरणकार आहे, तो निदान काही लोक प्रत्यक्षात काय बोलत, हे सांगतो. तेव्हा त्याची साक्ष काढता येणार नाही.

पाणिनी हा वायव्य सरहद्दीच्या प्रदेशाचा रहिवाशी होता; पण पतंजली उत्तरमध्य भारतातील भाषेचे वर्णन करतो. कोणत्या प्रदेशातील भाषा श्रेष्ठ, असा वाद पाणिनी घालत नाही. ते स्वाभाविक आहे कारण तो कुणा प्रदेशाच्या नव्हे, तर एका विशिष्ट स्तरातील भाषकाच्या भाषेचे वर्णन करीत आहे. खऱ्या अर्थाने पतंजलीही तेच करतो. सामाजिक भाषाशास्त्रज्ञ गुंपेर्झ (Gumperz) यांनी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

कर्नाटकातील देशस्थ ब्राह्मणांच्या भाषेचा अभ्यास केला, तेव्हा त्यांना असे आढळले, की प्रदेशभिन्नतेमुळे या भाषेत काही फरक पडतात, असे आढळत नाही. याचा अर्थ असा करता येईल, की पाणिनी, पतंजलींची भाषा हीही प्रामुख्याने एक सामाजिक बोली होती, प्रादेशिक नव्हे. पतंजली तर ती बोलणाऱ्या सामाजिक स्तराचे साक्षात वर्णनही करतो (पृ. २५-२७) ते दोघेही पाणिनीच्या शलातुर या गावाची किंवा पतंजलीच्या आर्यावर्त या देशाची भाषा वर्णन करीत नसल्यामुळे त्या दोन प्रदेशांतील भौगोलिक अंतर लक्षात घेऊन काही उपयुक्त निष्कर्ष काढता येतील, असे नव्हे. वास्तविक पाहता देशपांड्यांचे गुरू कार्दोना यांनी हा मुद्दा आधीच मांडलेला होता. (पृ. ७१). पण त्यांनी या भाषेचे वर्णन करताना native language of an elite असे म्हटले आहे. देशपांड्यांना native आणि elite हे शब्द परस्परविरोधी वाटतात. (पृ. ७२) मला ते परस्परविरोधी वाटत नाहीत. कारण elite हा समाजाचा एक स्तर आहे. native language (मातृभाषा किंवा तत्सम भाषा) ही भाषा - शिक्षणातील संकल्पना आहे. प्रत्येक समाजघटकाला कोणती ना कोणती मातृभाषा किंवा तत्सम भाषा असायलाच हवी, हे लक्षात घेतले की native आणि elite यांच्यांतील विरोध नष्ट होतो. त्यामुळे संस्कृत ही सर्वांचीच मातृभाषा नसली, तरी काही थोड्या लोकांची मातृभाषा सहज होऊ शकते.

आता व्याकरण न शिकताही काही लोक सफाईने संस्कृत बोलत, हे मान्य करता येते (पृ. ११७) पण ती त्यांची मातृभाषाच कशावरून, असे विचारता येईल. जी समाजातील कुणाचीच मातृभाषा नाही आणि जिचा एखाद्याने व्याकरणशुद्ध असा अभ्यासही केलेला नाही, तरीही ती भाषा कुणाला सफाईने बोलता येते, हे भाषाशिक्षणाच्या विद्यार्थ्यांना मान्य होण्यासारखे नाही. पृ. २५, २६, २७ वरील उद्धृत केलेल्या पतंजलीच्या विवेचनाचा वरवर अभ्यास केला, तरी लक्षात येते, की तो जिचे व्याकरण लिहीत आहे ती निदान काही जणांची आणि बहुधा पाणिनीप्रमाणे त्याचीसुद्धा मातृभाषाच आहे. या विवेचनातले मुद्दे थोडे विस्ताराने इथे सांगावे लागतील. कारण त्याखेरीज या विषयाचे स्पष्टीकरण होणार नाही.

पतंजली 'शिष्ट' लोकांच्या भाषेचे व्याकरण लिहीत आहे. या अवतरणाचे मी जरा स्वैर भाषांतर करणार आहे. विशिष्ट प्रकारच्या चांगल्या वागणुकीचे हे **लोक** फक्त घडाभर धान्य साठवतात आणि निर्लोभी वृत्तीने विद्याभ्यास करत **असतात**. व्याकरणाचा अभ्यास न करताही पाणिनीने सिद्ध केलेले प्रयोग तर **त्यांच्या भाषेत** आढळतातच, पण त्याव्यतिरिक्तही काही प्रयोग ते वापरतात. **या भाषेचे व्याकरण** पतंजली लिहीत आहे. मला वाटते, की या अवतरणाला



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

जोडून पृ. ११८ वरील कथा घेतली, तर हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल. एकाने एका सूताला उद्देशून प्रवेता असा व्याकरणशुद्ध शब्द वापरला, तेव्हा तो केवळ व्याकरणाने सिद्ध होणारी रूपे वापरणाऱ्या भाषकांना मूर्ख (देवांना प्रिय:) असे म्हणून व्यवहारात इष्ट असणारी रूपे वापरणारा (तो स्वत:) मूर्ख नाही असे म्हणतो आणि स्वत:ला उद्देशून प्राजिता असा शब्द वापरतो. पतंजली अशा झापडबंद व्याकरणतज्ज्ञांसारखा नाही, हे उघड आहे. तो प्राप्त म्हणजे निव्वळ व्याकरणाने सिद्ध होणारी अशी रूपे नव्हे, तर इष्ट म्हणजे प्रत्यक्ष व्यवहारात अपेक्षित असणारी अशी रूपे विचारात घेतो. आता जो पतंजली असा empirical grammarian आहे, तो पाणिनीसंबंधी अंधश्रद्ध असेल, असे वाटत नाही. 'पाणिनीने सिद्ध केलेले प्रयोग मी माझ्या भाषेत वापरतो, म्हणून माझी भाषा प्रमाण, असे नव्हे, तर मी जे प्रयोग वापरतो, त्यांतील अनेक-सर्व नव्हे - प्रयोग पाणिनीने आधीच सिद्ध केले होते, म्हणून पाणिनी हा महान व्याकरणकार असा त्याचा उलट आग्रह असला पाहिजे. मग पाणिनीबद्दल आदर दाखवण्यासाठी त्याला भगवान म्हणण्यात त्याला अडचण नाही. तेव्हा पतंजली हा एक जिवंत भाषेचे व्याकरण लिहीत आहे, हे स्पष्ट आहे. अन्यथा त्याला इष्ट शब्दांऐवजी फक्त प्राप्त शब्दांचे वर्णन करावे लागले असते. पृ. ११९-१२० वर देशपांड्यांनी संस्कृत ही ब्राह्मणांची द्वितीय भाषा असावी, मातृभाषा नव्हे, असे जे म्हटले आहे, ते मान्य होण्यासारखे नाही. यासंबंधी अजूनही काही गोष्टी लक्षात घ्यायला हव्या.

ही शिष्टभाषा म्हणजे संस्कृत तत्कालीन समाजाची प्रमाणभाषा, संस्कृती, काव्य, कायदा, शिक्षण, राज्यव्यवहार, धर्मव्यवहार, व्यापार यांची वाहक असावी. समाजातील सर्व घटक ती बोलत नसले, तरी ती त्यांना समजत असावी. कारण अशाच भाषांचे व्याकरण लिहिण्याची आणि अभ्यासण्याची सर्वसाधारण परंपरा आहे. इंग्रजीचे व्याकरण लिहिताना King's English आणि फ्रेंचचे व्याकरण लिहिताना. प्रमाण फ्रेंचचेच व्याकरण लिहितात, त्यांच्या अनेक उपभाषांपैकी एखादीचे नव्हे. जी मराठी प्रा. देशपांडे घरी आणि विद्वत्सभेत वापरतात, तीच मराठी ते भाजीविक्याशी बोलतानाही वापरतात. ती त्या भाजीविक्याला समजत नाही, असे होत नाही. त्यासाठी देशपांड्यांना त्याच्या उपभाषेत बोलावे लागत नाही. कण्वाशी संस्कृत बोलणारा दुष्यंत कोळ्याशीसुद्धा संस्कृतमध्येच बोलतो. तेव्हा त्या काळात संस्कृत आणि प्राकृत अशा दोन्ही भाषा जाणणारे आणि वापरू शकणारे बहुभाषक ज्याप्रमाणे असू शकतील, त्याप्रमाणे संस्कृत/प्राकृत सर्वत्र वापरणारे एकभाषीयही असले पाहिजेत.

यर्वाणतर्वाण नावाच्या एका महर्षीची पतंजलीने गोष्ट सांगितली आहे. (पृ.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

८१, ८५, ८८, ११३). ते सर्वत्र शुद्ध संस्कृत बोलण्याची क्षमता असतानाही काही वेळा यद्वान: तद्वान: या ऐवजी यर्वाण तर्वाण असे अपशब्द बोलत, म्हणून त्यांचे नाव यर्वाणतर्वाण पडले. पण अतिशय प्रगाढ प्रज्ञेचे, धर्माचे साक्षात ज्ञान असणारे हे महर्षी यज्ञकर्मात मात्र चुकूनही अपशब्द बोलत नसत. कारण यज्ञकर्मात शुद्ध अशीच भाषा वापरली पाहिजे, असा नियम आहे. याज्ञे कर्मणि सनियम: या पतंजलीच्या वाक्याचे भाषांतर करताना देशपांडे 'निदान यज्ञकर्मात तरी संस्कृत बोलावे, एवढाच मर्यादित आग्रह पतंजलीने धरलेला आहे, असे लिहितात. त्यातील निदान, तरी, एवढाच, मर्यादित आग्रह वगैरे शब्दांना मूळ वाक्यात काही आधार नाही. त्यामुळे ही मंडळी यज्ञकर्म संपल्यावर अन्यत्र प्राकृत बोलत असावी, असा निष्कर्ष काढता येत नाही. माझासुद्धा एक मित्र प्रमाण मराठीभाषक असूनही अनेकवेळा फार पुष्कळ या अर्थाने 'लई' असा शब्द वापरत असे. पण विद्वत्सभेत मात्र तो चुकूनही 'लई' म्हणत नसे. यावरून निदान विद्वत्सभेत तरी प्रमाण मराठी बोलली जावी, एवढाच मर्यादित आग्रह धरता येणार नाही. माझे उलट म्हणणे असे आहे, की एखादी भाषाही मातृभाषा असेल, तर तिची उपबोलीसुद्धा तिचा सांगोपांग अभ्यास केल्याखेरीज सर्वत्र बोलता येणार नाही. काही विशिष्ट परिस्थितीत लई, वंगाळ, बाईल, यर्वाणतर्वाण म्हणता येणे हे ठीक आहे; पण ती संपूर्ण उपबोलीच व्यवहारात वापरणे हे अतिशय दूरापास्त आहे. पतंजलीनेही यर्वाणतर्वाणांनी असे धाडस केल्याचे नमूद केलेले नाही.

एखादी भाषा मातृभाषा होण्यासाठी ती कमीत कमी आईला यायला हवी, असे देशपांडे म्हणतात (पृ. ८१), ते अर्धसत्य आहे. प्रश्न असा आहे की, तत्कालीन स्त्रियांना संस्कृत येत नव्हते, हे कशाच्या आधारावर म्हणणार? पतंजली म्हणतो, की त्यांना रचा उच्चार करता येत नसल्यामुळे हेऽरयो हेऽरय: असे म्हणण्याऐवजी हेलयो हेलयो असे म्हणणाऱ्या असुरांप्रमाणे प्रसंगी त्या ऋतसारख्या शब्दाचा उच्चार लृत्तक असा करतात. बस्स! यावरून त्यांना संस्कृतच बोलता येत नाही, एवढा व्यापक निष्कर्ष निघू शकतो? (पृ. ८१, ८२, ११४, ११६ यांच्या ध्वन्यर्थाची गोळाबेरीज) आता माझ्या पत्नीचे नाव कात्यायनी असून, तीही स्त्रीप्रज्ञ आहे. तीही विद्वत्सभेत वाद करायला जात नाही. मी ज्याला टोमॅटो म्हणतो, त्याला ती टामाटू म्हणते, मी ज्याला खोबऱ्याची चटणी म्हणतो, त्याला ती लसणीचे तिखट म्हणते, याचा अर्थ तिला ॲ हा स्वर उच्चारताच येत नाही, आधुनिक प्रमाण मराठी बोलता येत नाही, असा करावा लागेल. मग माझ्या मुलाची मातृभाषासुद्धा प्रमाण मराठी होऊ शकणार नाही. गंमत म्हणजे पृ. ८३ वर देशपांडे मान्य करतात, की काही स्त्रिया, शूद्र वगैरेसुद्धा थोडेफार संस्कृत बोलत असतील,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

नाही असे नाही. तेव्हा त्यांना नेमके काय म्हणायचे आहे, ते समजणे अवघड होते. मुळातच प्रमाण भाषा बोलू शकणारा वर्ग अल्पसंख्य असतो. आणि बोलताना कुणाच्याही व्याकरणाच्या चुका होऊ शकतात. तेव्हा काही स्त्रिया, शूद्र थोडे-फार संस्कृत बोलू शकत, म्हणजे ते नेमके किती, हे ठरविणे अशक्य होते.

ब्राह्मणांनी बोलताना उदात्त, प्लुत वगैरे स्वरांचा यथायोग्य वापर करावा, असे पतंजली म्हणतो. उदा., स्त्री, शूद्रादिकांना प्रत्यभिवादन करताना भोःचा स्वर उदात्तप्लुत करायचा नाही, अशा एखाद्या सूत्राच्या आधारावरून ब्राह्मणांचा इतर समाजाकडे पाहण्याचा दृष्टिकोन दिसतो, असे देशपांड्यांना वाटते. आता मराठीतील आपण, तुम्ही वगैरेसारखे शब्द मीसुद्धा काही ठरावीक व्यक्तींनाच उद्देशून वापरतो. त्याचा अर्थ मराठी व्याकरण हे एका विशिष्ट जातीकरताच लिहिले गेले आहे आणि इतर लोकांच्यासाठी त्यात काहीच नाही, असा होतो, की काय? संस्कृत भाषा येत असणाऱ्या ब्राह्मण पुरुषांनी संस्कृत येणाऱ्या ब्राह्मण पुरुषांशी बोलतानाच संस्कृतमध्ये बोलावे, एवढा व्यापक नियम त्यावरून निघत नाही. मुळामध्ये स्वरांमुळे शब्दांचे अर्थ सूक्ष्मपणे बदलत जातात. पण स्वरांवरची ही पकड पतंजलीच्या आधीसुद्धा कित्येक शतके ढिली पडत गेली (पृ. १११) अगदी पतंजलीसुद्धा प्रांजळपणे सांगतो, की ज्यांना धाडस करायचे नसेल, त्यांनी सर्व प्लुत स्वर वैकल्पिक मानावे (पृ. ११२) म्हणजे प्लुत स्वर न वापरताही संस्कृत बोलता येते, फक्त ते स्त्रिया, अडाणी पुरुषांच्या संस्कृतप्रमाणे वाटेल, हे त्याला मान्य आहे. स्त्रियांना किंवा अडाणी माणसांना संस्कृतच येत नाही, असे तो म्हणत नाही. अडाण्याशी संस्कृतमध्ये बोलूच नये, असा कैयटाचा नियम अशा काळातला आहे, की ज्या काळात ती भाषा म्हणून मृत झाली होती. त्याच्या या नियमाला पतंजली, पाणिनी, कात्यायन यामध्ये कुठेही आधार नाही - ते कदाचित त्याचे व्यक्तिगत मतसुद्धा असू शकेल.

मला पडलेला प्रश्न असा, की पाणिनी, पतंजलीच्या काळातील ब्राह्मण स्त्रिया संस्कृत बोलत नसतील, तर अन्य काय बोलत असाव्या? अपवादात्मक म्हणून एखाद्या गार्गीनि संस्कृत बोलण्यास देशपांड्यांची हरकत नाही. पण त्याच समाजात वावरणाऱ्या कात्यायनीला मात्र का संस्कृत बोलता येत नाही? अगदी वीस-पंचवीस वर्षांपूर्वीसुद्धा चूल आणि मूल हेच स्त्रियांचे क्षेत्र असे; मग दोन हजार वर्षांपूर्वी बाप, सासरा, नवरा, भाऊ, मामा, काका, दीर, इ. सर्व संस्कृत बोलणाऱ्या पुरुषांमध्ये वावरणाऱ्या स्त्रीला प्राकृत येण्यासाठी प्राकृतचा जो संपर्क आवश्यक आहे, तो तिला कुठे मिळणार? ती आधी घरातून बाहेर पडत नाही. पडल्यास तिच्यासारखीच अवस्था असणाऱ्या दुसऱ्या ब्राह्मणीकडे जाणार, भरीस



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

भर म्हणून तिच्याकडे कोणी प्राकृत बोलणाऱ्या स्त्रिया आल्याच, तरी ती त्यांच्याशी प्राकृत बोलणार नाही. आजही प्रमाणमराठी बोलणाऱ्या स्त्रिया तिच्या उपभाषा शिकताना दिसत नाहीत. अशा परिस्थितीत त्या स्त्रिया केवळ प्राकृतवर प्रभुत्व मिळवतात, एवढेच नव्हे, तर प्राकृतची पुरुषी स्वरूपेही त्यांच्या मुलांना शिकवतात म्हणजे वयाच्या पाचव्या वर्षापर्यंतच तो मुलगा प्राकृत मातृभाषेचा होऊन बाहेर पडतो. म्हणजे एकाच घरात स्त्री, कुमारिकांसह लहान मुलांची प्राकृत ही मातृभाषा आणि पुरुषांची मात्र संस्कृत ही (पितृ?) भाषा असा अनवस्था प्रसंग ओढवेल. मला हे सर्व अनाकलनीयच वाटते. पण तेही मान्य करायला हरकत नाही. त्यातील अडचण एकच आहे. प्राकृत ही त्याची मातृभाषा असली, तर संस्कृतही त्याची द्वितीय भाषा होईल. मग त्यात काय बिघडले? बापहो, संस्कृत ही त्याची द्वितीय भाषा असेल तर ती त्याला मुद्दाम व्याकरणाचा अभ्यास करून शिकावी लागेल. मुख्य म्हणजे ती द्वितीय भाषा असणाऱ्या अशाच पुरुषांकडून शिकावी लागेल. ही मालिका कधी खंडित होणारच नाही. म्हणजे त्याला पाणिनीने आधी सिद्ध केलेले असे प्रयोगच प्राप्त होतील, इष्ट प्रयोग नव्हे. मग ज्या इष्ट प्रयोगांच्या वर्णनासाठी पतंजलीने महाभाष्याचा हा सर्व डोलारा उभारलेला आहे, तो डोलाराच कोसळून पडेल. संस्कृत ही जिवंत भाषा नसेल, कुणाचीच मातृभाषा नसेल, तर महाभाष्याला काही प्रयोजनही उरत नाही. लहानगा पतंजली बाजारात गेल्यावर भाजीविक्याला त्याची संस्कृत बोलता येणार नाही, हे मान्य. पण ती समजणारसुद्धा नाही, असे म्हणणे अवघड आहे. आपिशलीचे व्याकरण शिकवणाऱ्या आणि मीमांसेचा अभ्यास करणाऱ्या काही स्त्रियांचा त्याने उल्लेख केलेला आहे. (पृ. ११६) अशा स्त्रियाच काय, पुरुषही अपवादात्मकच असले पाहिजेत, हे उघडच आहे. ते मान्य करण्यात अडचण नाही. पण 'कथं स्त्री नाम सभायां साध्वी स्यात्,' स्त्रिया विद्वत्सभेत फारशा दिसत नाहीत, असे म्हणताना, पुरुषांपैकी तरी कितीजण व्याकरणाचा आणि तत्त्वज्ञानाचा अभ्यास करताना आढळतात, असा प्रश्न विचारला जात नाही. तसेच, व्याकरण शिकणे आणि 'भाषा येणे' या वस्तुस्थितीचा काय संबंध आहे, असेही विचारले जात नाही. प्रश्न हा अशा अपवादात्मक स्त्री-पुरुषांच्या संख्येचा नाही. त्या/ते व्याकरण शिकत नव्हते, म्हणून संस्कृत त्यांची मातृभाषा नव्हती, असे म्हणता येत नाही, या सत्याचा आहे.

स्त्रियांच्या भाषेतील दूषणे सांगताना पतंजली र/ल आणि स्वर यांच्या व्यतिरिक्त फार काही सांगताना दिसत नाही. वस्तुतः स्त्रियाच विशेषतः उच्चवर्णीय स्त्रिया भाषेचे जुने (म्हणजे एका दृष्टीने शुद्ध) स्वरूप कायम ठेवण्याविषयी तत्पर असतात, असे सामाजिक भाषाशास्त्रज्ञांचे एक निरीक्षण आहे. तेव्हा पतंजलीपेक्षा





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

त्याची वृद्ध आजी किंवा बायको जास्त शुद्ध संस्कृत बोलत असावी. यातला विनोदाचा भाग सोडून देऊ; कारण व्याकरणाच्याबाबतीत तो चुका करील, अशी शक्यता कमी आहे. पण म्हणून त्याची आई, आजी, पत्नी यांना संस्कृत येत नव्हते, असे म्हणता येणार नाही. पुरुषांचा स्त्रियांकडे पाहाण्याचा काय दृष्टिकोण आहे, यावर त्यांची भाषा ठरत नाही - ती एक परंपरा असते. रचा ल करणे, स्वरांना उदात्त, प्लुत वगैरे वैकल्पिक मानणे या सामान्य गोष्टी मानल्या, तर एकीकडे ब्राह्मण पुरुषांचे संस्कृत आणि दुसरीकडे ब्राह्मणेतर पुरुष आणि स्त्रियांचे प्राकृत असे भेद न राहता सामान्य ब्राह्मणेतर स्त्रीपुरुषांचे प्राकृत, सामान्य ब्राह्मण स्त्रीपुरुषांचे संस्कृत आणि फक्त वैयाकरणाचे संस्कृत असे भेद पडताना दिसतात. आजच्या इंग्रजी, मराठी, फ्रेंच अशा जिवंत भाषांतही असे फरक थोड्या फार प्रमाणात पडताना दिसतात. स्त्रिया काव्यात प्राकृत का बोलतात, हा एक अनाकलनीय नियमाचा भाग आहे. त्यांना संस्कृत येऊ नये, इतकी संस्कृत इतर भाषांपेक्षा जास्त अवघड आहे, असे कोणीही भाषाशास्त्रज्ञ मान्य करणार नाही.

पाणिनी पतंजलीचे व्याकरण ब्राह्मणांनी, ब्राह्मणांचे म्हणून, फक्त ब्राह्मणांसाठीच लिहिले, हे संपूर्ण असत्य आहे. इतरांनी व्याकरणशुद्ध संस्कृत बोलू नये, असा त्यांचा कटाक्ष नव्हता. किंबहुना झापडबंद वृत्तीने वावरणाऱ्या वैयाकरणाला ताळ्यावर आणणारा सूत हा ब्राह्मणेतरच होता. पतंजलीचा कटाक्ष असा आहे की, अनेक अपभ्रंशांच्या गलक्यात (सर्वांना समजू शकणारी) अशी जी भाषा आहे, तीही अशीच भ्रष्ट होत गेली, तर समाजाच्या धारणेसाठी एक संस्कृती एक भाषा अशी मिळू शकणार नाही. अर्थात हे माझे interpretation आहे. पतंजली स्वत: तसे म्हणत नाही. नैसर्गिकरीत्या शुद्ध संस्कृत बोलणारी थोडीच माणसं जगात अस्तित्वात आहेत, इतरांनी व्याकरण शिकायला हवे (पृ. १२१). ज्या संस्कृत आणि संस्कृतीच्या आधारावरच ब्राह्मणांचे जीवन चालले आहे, ती नष्ट झाली तर ब्राह्मणांचेही अस्तित्व नष्ट होईल. तेव्हा संस्कृतचा पुन्हा व्यापक प्रसार होण्यात ब्राह्मणांचे हित आहे. हे न समजण्याइतका तो अज्ञ नव्हता. शिवाय आज जातीपातीच्या राजकारणाचा जो खेळ चालतो, त्याच्यावर जाणे (to rise above that) यासाठी आवश्यक असणारी क्षमता त्या थोर पुरुषांमध्ये नव्हती, असाही त्याचा निष्कर्ष निघेल.

याच विचारातील दुसरा भाग : शूद्राने अभिवादन केल्यावर ब्राह्मणाने काय बोलावे, हे पतंजली सांगतो, पण शूद्राने काय बोलावे, हे मात्र सांगत नाही, याची काहींना खंत वाटते (पृ. ८४, उदा., राजेश्वरी पांढरीपांडे, हान्स हॉक). कुणी शास्त्रीय चर्चेत काही चूक केली, तर त्याबद्दल खेद व्यक्त करून ती



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

चूक दाखविणे ही सर्व शास्त्रज्ञांची नैसर्गिक जबाबदारी आहे. फक्त अभिवादनातच काय इतरत्रही शूद्राने काय बोलावे, हे पाणिनी का सांगत नाही? प्रश्न असा की, शूद्राने काय बोलावे किंवा शूद्र काय बोलतात, हे सांगणे ही पाणिनीची, पतंजलीची जबाबदारी आहे का? ते एक प्रमाण भाषेचे व्याकरण लिहितात. तेव्हा शूद्राला ती बोलायची असेल, तर त्याने काय बोलावे, याचे उत्तर आपोआपच मिळते. तो दुसरी उपभाषा बोलणार असेल, तर अशा किती उपभाषांचे वर्णन केल्यास ते योग्य ठरेल? आणि दुसरे म्हणजे, उपभाषांचे वर्णन करणे हा dialectology नावाचा एक स्वतंत्र विषय आहे आणि विशेषत: आधुनिक भाषाशास्त्राच्या उदयानंतर तो भरभराटीला आलेला आहे. पाणिनी, पतंजली हे व्याकरणकार होते dialectologists नव्हे. जे काम त्यांनी कधी अंगीकारलेच नाही, किंवा जे त्यांचे कधी काम नव्हतेच, ते त्यांनी केले नाही म्हणून खंत व्यक्त करणं यात एकतर न्यायबुद्धी नाही किंवा दुसरे म्हणजे, त्यात कालविपर्यासाचा दोष (anachronism) ओढवून घेण्यासारखे आहे. ज्या अर्थाने दामल्यांचे व्याकरण हे एका उच्चस्तरीय जातीच्या भाषेचे व्याकरण आहे, पण सर्वच समाजासाठी लिहिलेले आहे, त्याच अर्थाने पाणिनीचे व्याकरण सर्व समाजासाठीच लिहिलेले आहे. त्याला जातीयवादाचा रंग देण्याची गरज नाही.

शेवटी भाषा किंवा व्याकरणाशी संबंधित नसलेला, पण प्रा. देशपांड्यांनी वारंवार उपस्थित केलेला मुद्दा. स्त्रियांना शुद्ध संस्कृत येत नाही, असे म्हणण्यात तत्कालीन समाजाचा स्त्रीकडे पाहण्याचा दृष्टिकोण दिसतो, असे त्यांना वाटते. तसा तर तो अन्य क्षेत्रांतही दिसतो. प्रश्न असा की, त्यात सत्याचा अंश किती?

स्त्रीला मारझोड करणारे पुरुष जसे असतात, तसे स्त्रीच्या मुठीत असणारे बाईलबुद्धीही अनेक असतातच. संस्कृत काव्यात उदात्त पुरुषांची वर्णने जास्त येतात, म्हणून बाईवेडेपणाची चित्रणे कमी आढळतात, एवढेच. दुसरे म्हणजे, आज तरी समाजातील पुरुषांचाच काय, स्त्रियांचा तरी स्त्रीकडे पाहण्याचा दृष्टिकोण खरेच बदलला आहे काय? आज नोकरी करण्यासाठी बाहेर पडणाऱ्या स्त्रिया साधारणपणे शिक्षण, बँक, ऑफिस वगैरेंसारखी उच्चभ्रू समाजाची (म्हणजे पर्यायाने ब्राह्मणांची?) क्षेत्रे पसंत करताना आढळतात. स्त्रीमुक्ती, स्त्रीस्वातंत्र्य, समान हक्क वगैरेंचा घोष करणाऱ्या स्त्रिया चुकूनही चांभार, लोहार, कुंभार, शेतकरी, सुतार यांची कामे करायला जाताना दिसत नाहीत. पण पाणिनी, पतंजली यांच्याकाळी हेच व्यवसाय जास्त प्रमाणात आढळत. आज मिळणाऱ्या व्यवसायांपैकी किती व्यवसाय त्या काळातील स्त्रियांना उपलब्ध होते? त्या काळातील स्त्रिया बंधनात असत, असे म्हणणारे विचारवंत हे सांगण्याचे कष्ट घेत नाहीत की, तत्कालीन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

समाजात खरंच स्वतंत्र असलेली स्त्री कोणता व्यवसाय स्वाभिमानपूर्वक आणि आत्मसन्मानपूर्वक करू शकली असती. वास्तविक मुलांच्या शिक्षणाचा काही भाग, प्राथमिक स्वरूपातील वैद्यकी, शिवण वगैरे काही गोष्टी स्त्रिया करतच असत. फक्त एवढेच की, त्यासाठी त्यांना हजारो रुपयांचे पगार मिळत नसत. पण त्या काळात कुणाला एवढा पगार मिळे? तरीही आजच्या स्त्रीपुरुषांप्रमाणे तेही तितक्याच आनंदात जगत असावे - त्यामुळे स्त्रीकडे पाहण्याचा समाजाचा दृष्टिकोण फारसा बदललेला आहे, असे काही दिसत नाही. खरे म्हणजे, समाज हा स्त्रीपूजक नसतो आणि स्त्रीद्वेष्टाही नसतो. स्त्रीला मारझोड करणे एवढाच पुरुषांचा कार्यक्रम असता, तर 'न मातुः परं दैवतं, यत्र नार्यस्तु पूज्यन्ते' वगैरे विधाने खोटी, दांभिकपणाची आहेत, असे म्हणावे लागेल. तेही एक वेळ मान्य करता येईल. पण स्त्रीला त्या काळात खरेच सन्मान मिळत नसता, तर 'कांतासंमिततयोपदेशयुजे' हे काव्याचे लक्षण व्यर्थ होईल आणि 'गृहिणी सचिवः, सखी' वगैरे म्हणणारा कालिदासही दांभिक ठरेल. पण माझ्या माहितीतील कोणीही स्त्री ते मान्य करायला तयार होत नाही. प्रा. देशपांड्यांच्या वाक्पतिराजाला सत्य हे सुवर्णमध्यात सापडते, या सत्याचे दर्शन झाले होते. याही वादात तेच खरे आहे. 'कथं स्त्री नाम सभायां साध्वी' असे allegedly पुरुषी अहंकाराने विचारणारा पतंजली आणि आपल्या ब्रह्मवादिनी प्रज्ञेने सभेत वाद करणाऱ्या स्त्रिया यांच्यांतला सुवर्णमध्य आहे तो स्त्रीप्रज्ञ कात्यायनीचा, विद्वत्सभेत वादविवाद न करणारी पण आपल्या मुलाशी म्हणजे कात्यायनाशी संस्कृतमध्ये बोलणारी आणि न कळत का होईना त्याच्यावर व्याकरणाचे संस्कार करणारी, शर्मिष्ठेप्रमाणे दुःख सहन करायला न लागणारी. पण तरीही भर्तुर्बहुमता असलेली अशी ही कात्यायनी हीच समाजाचे खरे प्रतिनिधित्व करू शकते. पतंजली किंवा मैत्रेयी नव्हे.

**भाषाशिक्षण विभाग, श्री. ना. दा. ठा. महिला विद्यापीठ, मुंबई ४११ ०२०**

■ ■



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

# तीन पायांची बाई

मनोहर राईलकर

शब्दांच्या क्रमाचं महत्त्व शिकवणारा एक विषय, इंग्रजी व्याकरणाचा भाग म्हणून, मॅट्रिकला असताना आम्हांला अभ्यासाला असे. शब्दांचा क्रम जर चुकला, तर कधी कधी कसे अनर्थ होऊ शकतात. याचं एक उदाहरण म्हणून एक गमतीदार वाक्य आम्हांला सांगितलं जात असे. ते वाक्य असं काहीतरी होतं

For a sale, a piano of a lady with three legs, ebonite case and walnut polish, somewhat old, but still attractive...

मला सगळं वाक्य नेमकं आठवत नाही, म्हणून कल्पनेनं मी काही भर घातली आहे. ह्या वाक्यात पियानो आणि त्याचं वर्णन ह्यांच्या दरम्यान ही बाई असल्यामुळं तिला आणखी एक पाय फुटला, एबोनाइट केस आली. आणि वृद्ध (नसली, तरी) असूनही, ती आकर्षक असल्याचं जाहिरात सांगू लागली. वगैरे.

'५००० फूट व्यासाचे १०,००० प्रेक्षक बसू शकतील, एवढे प्रचंड स्टेडियम...' असंही एक वाक्य कुठंतरी वाचल्याचं आठवतं.

अलीकडे अशा तीन पायांच्या बाया मराठी वाङ्मयातून फार दिसू लागल्या आहेत आणि ५००० फूट व्यासाचे प्रेक्षकही ! ह्या प्रकारचे दोष जमवून त्यांची छानशी जंत्री करायला मला फार कष्ट पडले नाहीत. कारण ते पुरवण्याची जबाबदारी काही लेखकांनी (त्यांना जबाबदारीची पुरती जाणीव असल्यानं असणार) आपण होऊन घेतली असावी !

Wren & Martin यांच्या High School English Grammar & Composition नावाच्या पुस्तकात (आवृत्ती १९४८, पृ. ४३५-४३७) जवळ जवळ चाळीस उदाहरणं दिली आहेत. त्यापैकी काहींचं भाषांतर मी इथं दिलं आहे. वाचकांना ते मनोरंजक वाटेल, असं वाटतं.

१) सुमारे आठ फूट लांबीच्या उन्हात बसलेल्या सरड्यांचं दर्शनही आपल्याला इथं घडू शकेल.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

२) तिच्याशी अनेकवार लग्न करण्याची इच्छा त्यानं बोलून दाखवली.

३) त्यानं उन्हाळ्याच्या सुट्टीत जिथं नेपोलियनचा पराभव, झाला त्या जागेला भेट दिली.

४) त्यानं रागाच्या भरात आईनं लिहिलेलं इतकं भावपूर्ण पत्र फाडून टाकलं.

५) त्या राक्षसानं बंदुकीच्या मदतीनं दाणे टिपणाऱ्या चिमण्यांना मारून टाकलं.

इतकी उदाहरणं पुरेशी आहेत. ही उदाहरणं खरी आहेत, की कृत्रिम, याबद्दल मला काहीही सांगता यायचं नाही. पण आजकाल वृत्तपत्रं, कादंबऱ्या वगैरे नाना तऱ्हेच्या वाङ्मयातून अशा बाया आढळतात. आपण जे काय लिहिलंय्, ते पुन्हा एकदा वाचून पाहावं, कुठं काही चुकलं बिकलं तर नाही ना, ते तपासावं, असं लेखकांना वाटत नाही का ? लिहिणाऱ्यांनी विनोदाकरता असं लिखाण नक्कीच केलेलं नाही. पण त्यांच्याकडून ते घडून गेले आहेत. हे नमुनेच पाहा ना. पदोपदी आणि घडोघडी असे हास्यास्पद वाक्प्रयोग कुणालाही पाहायला आणि वाचायला मिळतील. ही उदाहरणं खरी आहेत. हे नमुने कृत्रिम नाहीत. याची खात्री पटावी, म्हणून मी संदर्भ दिले आहेत.

कुठला शब्द कुठं हवा, याचा विचार लेखकांनी न केल्यामुळे असली वाक्यं तयार झाली आहेत, असं नाही वाटत ? बोलताना जरी ह्या क्रमानं वाक्यं म्हटली, तरी फारसं बिघडणार नाही. कारण त्या वेळी आपण योग्य त्या ठिकाणी थांबणं, शब्दांवर जोर देणं, इत्यादी प्रकारे अर्थ स्पष्ट करू शकतो. अशा तऱ्हेचे घोटाळे टाळण्यासाठी, कर्ता आणि क्रियापद यांच्यांत, किंवा संबंधित दोन शब्दांमध्ये कमीत कमी अंतर ठेवावं, असा एक ठोस नियम आम्हांला शाळेत सांगण्यात आला होता, असं मला स्मरतं.

वाक्य योग्य वाटण्याकरता ज्या शब्दांची जागा बदलावी, असं मला वाटतं ते शब्द ठळक टाइपात आहेत. योग्य ठिकाणी स्वल्पविराम देऊनही चाललं असतं. पण तो गौण मार्ग झाला असता. शब्दच योग्य जागी येणं जरुरीचं वाटतं, नाही का ?

तीन पायांची बाई (१) कशामुळं काय ?

(सकाळ, कलारंजन १९.५.९४ पृ. २) **संपत्तीसाठी** दिवस गेलेल्या कुंदाला झिडकारून रिमाशी लग्न करणाऱ्या...

तीन पायांची बाई (२) कोण ही मुं-बाई ?

(महाराष्ट्र टाइम्स दि. २७-१०-९५, पृ. १) **अमली पदार्थांची चोरटी आयात करणाऱ्या** मुंबईतील एका गुन्हेगाराकडून... (येथे योग्य त्या ठिकाणी दिलेल्या स्वल्पविरामानं काम भागलं असतं.)

तीन पायांची बाई (३) ?



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

(म. टा. द. २७-१०-९५, पृ. १) **काल रात्री ११ च्या सुमारास** डोक्यावर ओझे घेतलेले नऊजण - - - चौकीच्या परिसरातील गस्ती पथकाला दिसले.

तीन पायांची बाई (४) सोय ?

(म. टा. दि. ६-११-९५, पृ. ७) **या सोयीमुळे** ट्यूबला पडलेले छिद्र आपोआप बुजले जाते.

तीन पायांची बाई (५) न्यायालयाची तरी कमालच झाली.

(सकाळ दि. १६-१२-९५, पृ. ४) **न्यायालयाने** सन्मानाला घेतलेल्या सर्व हरकती फेटाळून लावल्या आहेत.

तीन पायांची बाई (६) लघुउद्योजकांना हे शोभतं का ?

(मुंबई तरुण भारत दि. २५-११-९५, पृ. १) **लघुउद्योजकांनी** जादा अनामत रक्कम घेण्याच्या विरोधात असहकार आंदोलन पुकारावे. (जादा अनामत रक्कम कोण घेत आहे, लघुउद्योजक, की दुसरं कुणी ?

तीन पायांची बाई (७) कसलं केंद्र ?

(लोकसत्ता २५-११-९५, पृ. ५) **ग्राहकव्यवहारविषयक** केंद्रात नवा विभाग.

तीन पायांची बाई (८) परिषदेनं भारतच बळकावला का ?

(मुं.त.भा. २५-११-९५ पृष्ठ-नोंद राहिली.) परिषदेने केवळ **स्वत:वरच्या** भारतातील अन्यायाबाबत बोलत न बसता...

तीन पायांची बाई (९) नील आर्मस्ट्राँगच्या आधीच ?

(लो. स. चे. लोकरंग २६-११-९५, पृ. १) **१९५० साली जर** कुणी माणूस चंद्रावर पाऊल टाकू शकेल, असे प्रतिपादन केले असते, तर...

तीन पायांची बाई (१०) यालासुद्धा परवानगी हवी ?

(साप्ताहिक सकाळ १६-१२-९५, पृ. ३०) एक जोगीण **परवानगीशिवाय** मरणोन्मुख असलेल्या एका लहान मुलाची सेवाशुश्रूषा करते.

तीन पायांची बाई (११) खंडणीचा नवा प्रकार ?

(लो. स. २६-१२-९५, पृ. १) **बड्या बिल्डरच्या** खंडणीसाठी भर दिवसा झालेल्या हत्यांमुळे...

तीन पायांची बाई (१२) दारातच मागण्या ?

(सकाळ दि. २६-१२-९५, पृ. ४) **काही दिवसांपूर्वी जिल्हाधिकाऱ्यांच्या दारात** आपल्या मागण्या मान्य व्हाव्यात, म्हणून पाच-सहा...

तीन पायांची बाई (१३) काय हे, आजोबा !

(सा. स. २०-१-९६, पृ. ३६) नातवंडांना **डोक्याला रुमाल बांधून** उचलवत नसलं, तरी कडेवर घेऊन येतात.

तीन पायांची बाई (१४) आधुनिक वाल्मीकी ?



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

(म. टा. २१-१-९६, पृ. ५) **आज** जसं त्यांनी लिहिलंय् तसंच घडतंय्...

तीन पायांची बाई (१५) खरंच कुणाला वॉरंट !

(लो. सं. २५-१-९६, पृ. नोंद राहिली.) **पोलिसांनी** वॉरंट बजावलं, की नाही, असं न्यायाधीशांनी विचारलं.

तीन पायांची बाई (१६) वस्तुस्थिती ?

(गृहशोभिका मार्च ९६ पृ. ६) लाचेच्या पैशानं नावारूपाला येणारा एक पक्ष पार कोलमडला.

तीन पायांची बाई (१७) संकेताला धरून ? काय ?

(लो. स. १२-३-९६, पृ. ३) **वृत्तपत्रीय संकेतानुसार** ही माहिती व कागदपत्रे सरकारमधील ज्या सूत्रांनी दिली, त्यांची नावे आम्ही उघड करू शकत नाही.

तीन पायांची बाई (१८) कमाल आहे ह्या स्त्रियांची !

(सा. स. नोंद राहिली.) **पाणी आल्यामुळे** स्त्रियांना सतावणारी एक समस्या दूर झाली.

तीन पायांची बाई (१९)

(ग्राहकहित एप्रिल ९६, पृ. २५) **बँकेला** भरपाई देण्याचा आदेश. (भरपाई बँकेने द्यायची आहे, असे लेख वाचल्यावर समजून आले.)

तीन पायांची बाई (२०) महिलांनो तुम्हीसुद्धा !

(संदर्भ सापडत नाही.) **महिलांनी** दारू बंदी केल्याशिवाय आंदोलन मागे घ्यायचे नाही, असे ठरवले.

तीन पायांची बाई (२१) अपराध मीच केला...

(सकाळ २६-४-९६ पृ. १) --- **पक्षाच्या युवक शाखेच्या अध्यक्षा** --- यांनी तत्त्वाशी तडजोड केल्याबद्दल पक्षनेतृत्वावर टीका केली.

तीन पायांची बाई (२२) शिक्षक होणं कित्ती (कित्ती) सोप्पं !

(लोकरंग ९-५-९६ पृ. ८) **शासनाच्या ह्या निर्णयानं** शिक्षक होऊ पाहणाऱ्या उमेदवारांच्या पोटात गोळा उठला असेल.

तीन पायांची बाई (२३) सभापतींना ?

(लोकसत्ता ३-६-९६ पृ. ६) त्यामुळे **जबाबदारीने वागा याची जाणीव** सभापतींना करून द्यावी लागली.

तीन पायांची बाई (२४) फक्त तीन महिन्यात आयात केलेलाच ?

(सकाळ २३-६-९६ पृ. १) **तीन महिन्यांत** आयात केलेला माल इथे पोचला पाहिजे.

तीन पायांची बाई (२५) अटलजी, तुम्हीसुद्धा !

(म. टा. २६-६-९६) **अटलीजींनी** बाबरी मशीद पाडली, त्याबद्दल खेद...



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

तीन पायांची बाई (२६) केवढी दुर्बीण असेल ही !

(सकाळ - त्रिदल २९-६-९६ पृ. १) **दुर्बिणीतून** मागे राहिलेले काही राखी बगळे, चमचे (स्पूनबिल)... ही बदके पाहिली.

तीन पायांची बाई (२७) चांगलीच सोय झाली.

(लो. स. २३-७-९६ पृ. ६) **पण नगरविकासखात्याच्या कार्यालयातच** घरे व दुकानं मिळवून देणारे दलाल आपले भ्रष्टाचाराचे उद्योग करीत.

तीन पायांची बाई (२८) वा खासदार !

(लो. स. २३-७-९६, पृ. ६) **मुद्दे नसलेल्या** खासदारांच्या भाषणांची फारशी चांगली प्रतिक्रिया झाली नाही.

तीन पायांची बाई (२९) पोलिसांचं काम ?

(लो. स. २७-७-९७ पृ. ५) ... **तिघा जणांना अटक करून** लुटण्यात आलेली सात लाखाची संपूर्ण रक्कम हस्तगत...

तीन पायांची बाई (३०) हीसुद्धा वस्तुस्थितीच ?

(सा. स. १०-८-९६, पृ. ९) **आमदारांच्या हस्ते** सुटलेल्या पाच आरोपींचा सत्कार झाला.

तीन पायांची बाई (३१) पुन्हा पोलिसच ?

(लो. स. २६-१०.९६, पृ. ६) **पोलिसांनी** घोटाळ्यातला पैसा कुठे कुठे वापरला, यावर लक्ष केंद्रित केले असून...

तीन पायांची बाई (३२) शिक्षा तुझ्या कपाळी ?

(दै. प्रभात ९.११.९६ पृ. ४) ... **सर्वोच्च न्यायालयाने** १५ पेट्रोल पंपांचे मनमानी आणि बेकायदेशीर वाटप केले, म्हणून...

तीन पायांची बाई (३३) प्राप्तिकर अधिकारीच !

(सकाळ २८-११-९६ पृ. ४) ... **प्राप्तिकर अधिकाऱ्यांनी** उत्पन्न लपविले, या सबबीवर दंडाची आकारणी केली.

तीन पायांची बाई (३४) अजून यौवनात ?

(लोस. २.१.९७ पृ. ८) ... प्रकरणापासून ते अगदी **ताज्या** जयललिताच्या प्रकरणापर्यंत...

तीन पायांची बाई (३५) स्वत: न्यायमूर्तीच ?

(लो. स. चतुरंग दि. ११.१.९७ पृ. १) ... स्वत: न्यायमूर्तींनी राधिका आणि शाजिया या दोन निष्पाप तरुणींना फसवून त्यांचं आयुष्य उध्वस्त केल्याबद्दल जमिलची निकालपत्रात कडक निर्भर्त्सना केलेली आहे.

**'गजांजली', ४६ वाळवेकर, इस्टेट, पुणे ४११ ००९.**

■ ■



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# मालखांड आणि ओथंबा

ब्रह्मानंद देशपांडे

## अ. मालखांड

### १. जैसे मालखांडा श्रीकृष्ण चक्रवर्ती देखिले

श्रीधरचक्रस्वामींचे वास्तव्य हीवरळी (जालना) येथे होते. नागदेवाचार्यांच्या 'जी: जी: परमेश्वरु आणि परमेश्वराचा संबंधु या दोहींची उपासना एकीची की भिन्न असे जी :' या प्रश्नावर निरूपण करताना श्री चक्रधर म्हणतात,[१] 'वानरेया : जीया प्रसन्नता परमेश्वरु सकळ जीवांते रक्षिता उद्धरिता होये : सकळ जीवांते आपुलेया प्रतीती दृश्य होए : जैसे मालखांडा श्रीकृष्णचक्रवर्ती सकळ लोकीं देखिलें...'

यातील मालखांड या शब्दाचा अर्थ डॉ. वि. भि. कोलते यांनी 'सौराष्ट्रातील एक तीर्थस्थान' असा दिला आहे. तो कशाच्या आधारावर, ते कळत नाही.

श्री गोविंदप्रभूसंबंधीच्या स्थानांची नोंद स्थानपोथीत आहे. त्यांतील नांदगाव (अमरावती-मोर्शी मार्गावर) येथील स्थानांच्या नोंदीत 'उत्तरे जगतीं आंतु अडु ॥ उंबरवट : पाइरीया ॥ खांडसाळ ॥' असा निर्देश आहे.[२] यातील 'खांडसाळ' या शब्दाचे उपर्युक्त 'मालखांड'शी काही नाते असावे, असे वाटते. थोडा बारकाईने विचार केल्यास खांडसाळ हा अनुवाद जोडशब्द (Translation Compound) असावा, असे वाटते. यातील 'साळ' (शाला, शाळा, साळ) आपणांस पदीसाळ (पडवी), टाकसाळ (टंकसाळा, Mint) आदी शब्दांत भेटते. पूर्वी भोजपुरी आदी हिंदीच्या बोलीत शाला-साळ याचे 'सार' असे रूप येते. (लोहकारशाला - लुहारसार). पण मग खांड शब्दाचा अर्थही जर शाळा असाच असेल, तर खांडिसाळ हा अनुवाद जोडशब्द ठरू शकेल.

### २. वेदखंडिकेचे कुळाग्र

गोवे प्रांतात बांदोडे अथवा बांदिवडे (फोंडा महाल) येथे विजयनगर येथील संगमवंशी नृपती देवराय प्रथम याच्या राज्यकालातील शिलालेख उपलब्ध झाला



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

आहे.[३] लेखाची तिथी 'श्रीसालवाहन सकु १३३५, विजय संवत्सर, पुण्य बहुल ३०, रवौ' (२१ जानेवारी, १४१४) अशी आहे. या लेखाच्या ७ व्या आणि ८ व्या ओळीत 'गोपाळभटा'नावे वेदखंडिकेचे कुळाग्र' असा निर्देश आला आहे. डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी वेद म्हणजे चार असा अर्थ घेऊन 'चार खंडी धान्य पिकणारे 'कुळाग्र' असा त्याचा अर्थ केला आहे, तो अनुमानित आहे, हे स्पष्टच दिसते.

**३. खंडिका-शाळा**

खंडिका हा शब्द अनेक प्राचीन शिलाताम्रशासनांमधून शाळा या अर्थाने येतो. अक्षर, शास्त्र पुराण, वेद, आदींच्या वेगवेगळ्या पाठशाळा असत. त्यासाठी हा शब्द शाळा या अर्थाने येतो. या खंडिकांचे उल्लेख अनेकानेक कन्नड शिलाताम्रशासनांतून येतात.[४] खंडिका (खोली अथवा खोल्या-खोल्यांची वास्तू) याचा अपभ्रंश खांड असा होऊन खांडसाळ हा अनुवाद जोडशब्द तयार झाला, हे उघड दिसते. वेदखंडिकेचे कुळाग्र हे गोपाळभटास बांदिवडे येथे वेदपठनाची शाळा चालविण्यासाठी मिळाले होते.

**४. विहामांडवा येथील बलखंडी देवी**

औरंगाबाद जिल्ह्यात पैठणच्या पूर्वेस विहामांडवा नावाचे गाव गोदावरीच्या तीरावर आहे. समर्थांचे थोरले बंधू गंगाधर अथवा श्रेष्ठ यांची ही सासुरवाडी. येथे बलखंडी देवीचा मठ ही वास्तू आहे. ही वास्तू बाराव्या-तेराव्या शतकातील असावी. मध्ये मोठे पटांगण, त्यापुढे अर्धमंडपयुक्त एक लगत एक अशी दोन सभागृहे, पटांगणाच्या तिन्ही बाजूंनी मंडप अशी यांची रचना आहे. गर्भगृह, प्रतिमा, शिल्प यांचा पूर्ण अभाव आहे. दक्षिण बाजूच्या मंडपात चार मोठे कोनाडे आहेत. तिथेच पाण्याचा मोठा दगडी रांजण आहे. श्रावणी पौर्णिमेस येथे बलखंडी देवीस अभिषेक आणि गावजेवण श्री. रा. रा. प्रभाकर दिगंबर कुलकर्णी करतात.

ही निश्चितपणे प्राचीन शाळा आहे. श्रावणी पौर्णिमेसच अध्ययनसत्राचा प्रारंभच होत असे. भव्य पटांगण, पदीशाळा, पाण्याचा रांजणही तेच सांगतात. ही यादवकालीन बालखंडिका अथवा शाळा होती, हे स्पष्टपणे जाणवते.

**५. मालखांड - मल्लशाळा**

आता मालखांड म्हणजे मल्लशाळा हा अर्थ स्पष्ट होतो. गोकुळातून श्रीकृष्ण मथुरेस गेले. ते कंसाने मुद्दाम तयार केलेल्या नटरंगात (stadium) मध्ये गेले. त्याचे वर्णन भागवत पुराणात आहे. तेथे श्रीकृष्णाविषयी वृद्धांना पुत्रवत्, स्त्रियांना मदनवत्, तरुणांना मित्रवत्, ऋषिमुनींना परब्रह्मवत् आणि कंसाला मृत्युदेवतेवत् भावना झाली. त्याचा संदर्भ श्रीचक्रधर

सकळ जीवांते एक वेळा आपुलेया प्रतीती दृश्य होए:



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

जैसे मालखांडा श्रीकृष्णचक्रवर्ती सकळ लोकीं देखिलें :
या वचनात देत आहेत.

पाटण (ता. चाळीसगाव, जि. जळगाव) येथे प्रख्यात गणिती भास्कराचार्य यांच्या लीलावती आणि सिद्धांतशिरोमणि या ग्रंथाच्या अध्ययन-अध्यापनासाठी मठ त्याचा नातू चंगदेव याने बांधला होता.[५] तेथील भवानी देवीच्या मंदिराचे स्वरूपही शाळेसारखेच दिसते. देवीची स्थापना नंतरची असावी. बहाळ येथेही भास्कराचार्य यांचा वंशज अनंतदेव यांची पाठशाळा होती.[६]

## ओथंबा

ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात ओथंबा अथवा वोथांबा असा शब्द खालील ओव्यांतून येतो.

साधकु विवसिया । कां उपसर्गे योगिया ।
पावे उणेया पुरेथा । वोथंबा जेवि ॥ १३, ५३५ ॥
हा प्रकृतिमाझी उभा । परि जुंई जैसा ओथंबा ।
प्रकृति पृथ्वी नभा । तेतला पाडु ॥ २३. १०१६ ॥

(महाराष्ट्र शासन प्रत)

यातील जुंई या शब्दाचा आधार घेत सर्वच टीकाकारांनी वोथंबा या शब्दाचा अर्थ जुईच्या वेलीच्या मांडवाला आधारासाठी दिलेला खांब असा केला आहे. हा खांब ज्याप्रमाणे त्या वेलीला आलेल्या फुलांच्या सुगंधाविषयी उदासीन वा तटस्थ असतो, तद्वत् जन्म-मृत्यू, रोग-म्हातारपण याविषयी साधक तटस्थ असतो असा काहीसा अर्थ पहिल्या ओवीचा केला गेला आहे. ओथंबा शब्दाशी उच्चारसाम्य असलेला वोळंबा-ओळंबा असाही अर्थ घेऊन वोळंबा ज्याप्रमाणे सरळपणा वा वाकडेपणा याविषयी तटस्थ असतो, तद्वत साधक सुख-दुःखांविषयी असतो, असेही ध्वनित केल्या गेले आहे. दुसऱ्या ओवीतही जुईच्या मांडवाला सावरून धरणारा डांभा असाच अर्थ केल्या गेला आहे. तेव्हा वोथंबा आणि तटस्थता, उदासीनता, निर्लेपता यांचे साहचर्य जाणवते.

श्रीचक्रधरांचे काही 'मोकळे दृष्टान्त' आहेत. त्यांची तालिका प्रा. व. दि. कुलकर्णी यांनी प्रकाशित केली आहे.[७] त्यातील ५२ वा दृष्टांत ज्वारीया वोथंबाचा आहे. क्वचित ब्वारीया वोथंबाचा असा पाठ सापडतो. सकळी लिपीत ब=ज आणि ज=ब हे संकेत असल्यामुळे हा घोटाळा झाला असावा. हा मोकळा दृष्टांत लीळाचरित्रात सापडतो. स्वामींचे वास्तव्य पैठण येथे ढोरेश्वराचा देवळात होते. संबंधी लीळा अशी.

'ढोरेश्वरी अवस्थान : एक वेळ गोसावी सारंगपंडितासीं कवडां खेळत होते



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

: तंव भट आले : मग सर्वज्ञे म्हणीतलें : 'वानरेया : तुम्ही येथ वोथंबे होउनि पाहा गा : जयाचा डावो जाइल तो सांगुनि देया गा :' तवं भटीं म्हणीतलें : 'जी जी : खेळिजे तयांसि कांइ ते न दिसे?' सर्वज्ञे म्हणीतलें 'ते आवेशें न देखति : वोथंबा डावो देखे:'

- लीळाचरित्र, उत्तरार्ध, लीळा क्र. ३९१

येथे ओथंबा अथवा वोथंबा या शब्दाचा तटस्थ, उदासीन, निर्लेप हा अर्थ चटकन ध्यानी येतो आणि ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायातील १०१६ या ओवीतील जुइं जैसा ओथंबा या पदाचा संबध जुइ या पुष्पविशेषाशी नसून, जू अथवा जुगार याच्याशी आहे, हे जाणवते.

वेरूळच्या लेणीसमूहात लेणे क्र. २१ अथवा रामेश्वर लेणे हे एक मनोरम लेणे आहे. त्याचा काळ इसवी सनाच्या सातव्या शतकाचा प्रारंभकाल असा आहे.[८] लेणीत शिरताच समोरच्या उजव्या हाताला शिवपार्वती चौरस खेळत आहेत असे शिल्प अंकित आहे. खोटं खेळून साळसूद स्मित करणारे शिव, रागावून उठण्याच्या पावित्र्यात असलेली पार्वत्री यांच्या मधोमध आहे डोईवर टोपरी घातलेला, दोन्ही हातांच्या तर्जनी हनुवटीशी जुळवून बसलेला, अवघे प्राण डोळ्यांत आणून डाव पाहणारा तटस्थ पंच - वोथंबा.

**संदर्भ**


१. लीळाचरित्र, पूर्वार्ध, लीळा. क्र. ४७५.

२. स्थानपोथी (सं. वि. भि. कोलते दु. आ.) पृ. ९२

३. शं. गो तुळपुळे. प्राचीन मराठी कोरीव लेख क्र. ५९. पृष्ठ ३०६-३१४.

४ Karnataka Inscriptions Vol. II, p. 21 also Bombay Karnataka (Inscriptions 1930-31 no. 8)

५. शं. गो. तुळपुळे उपर्युक्त क्र. २१, पृ. १०५-११३

६. Epigraphia Indica, III, pp. 110-113

७. श्री. व. दि. कुलकर्णी मराठी संशोधन खंड ४, पृ. १४३-१४५.

८. Brahmanand Desphande : Annals of the Bhandarkar Oriental (Research Institute Vol. LXX. pp. 248-254)



**ऐतिहासिक, १४, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद ४३१ ००५, दूरध्वनी (०२४०) ३३६६०६**







अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मराठी अभ्यास परिषद

**पुस्तक परीक्षण**

# अनुवाद, की अनुवादाचे विडंबन

**परीक्षण लेखक : विद्यागौरी टिळक**

*(परीक्षित पुस्तक - 'माय फ्यूडल लॉर्ड' / तहमिना दुराणी, अनु. लीला आवटे, रूपाली पब्लिशर्स, मुंबई, प्रथम आवृत्ती १९९३, पृ. सं. ४९१, मूल्य रु. १५०)*

गेल्या काही वर्षांमध्ये, मराठी ग्रंथ प्रकाशनक्षेत्रात, इंग्रजीत भाषेतील भल्याबुऱ्या कारणांनी गाजलेल्या पुस्तकांचे मराठी अनुवाद प्रसिद्ध करण्याची एक तऱ्हेची स्पर्धाच सुरू झालेली दिसते. काही तद्दन बाजारू पुस्तके यामुळे मराठीत येतात, हा तोटाही जाणवत असला, तरी एकुणात या अनुवादांचे सुजाण वाचक स्वागतच करतो.

परंतु याचा अर्थ, अनुवादाच्या नावाखाली, भाषिक व्यवहाराची सारी व्यवस्था गुंडाळून, झटपट तिकडच्या पाट्या इकडे टाकण्याचे काम (त्यालाही वस्तुतः काही शिस्त असतेच!) चालू व्हावे, असा नव्हे! दोन वेगवेगळ्या संस्कृतींमधील तफावत भाषिक भिन्नतेमधून व्यक्त होत असते. हे अंतर कुशल अनुवादकारालाही पूर्णतः मिटवता येत नाही, हे खरेच! परंतु वाचकाला दर वाक्यागणिक ठेचा लागू नयेत, अनुवादभाषेच्या एकूण वळणाशी तो अनुवाद जुळणारा हवा, यासाठी काही किमान काळजी आणि श्रम अनुवादकाराने घ्यायला हवेत. परंतु याकडे अधिकाधिक दुर्लक्षच व्हायला लागल्याचे जाणवते.

अनुवादकाराला दोन्ही भाषा नुसत्या समजत असणे पुरेसे नाही. केवळ शब्दकोश हाती ठेवून चांगला अनुवाद शक्य नसतो. त्यासाठी इंग्रजी-मराठीमधील व्याकरणव्यवस्था, वाक्यान्वयाचे नियम यांची पुरेशी जाणही गरजेची आहे. ज्या भाषेत आपण अनुवाद करीत आहोत, तिची पुरेशी जाण नसेल, तर काय होते, याचा एक चांगला नमुना 'माय फ्यूडल लॉर्ड' या तहमिना दुराणींच्या आत्मचरित्राच्या अनुवादाच्या रूपाने मध्यंतरी वाचायला मिळाला.

लीला आवटे यांनी अनुवादित केलेले हे पुस्तक अनेक प्रकारच्या भाषिक चुकांमुळे वाचकाला ओळीओळीगणिक ठेचकळायला लावते. सर्वच स्तरांवरचे भाषिक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

दोष या अनुवादामध्ये दिसून येतात. हौशी अनुवादकर्त्यास 'काय टाळावे?' याचे धडे देण्यासाठीच ते उपयुक्त ठरेल. अशी परिस्थिती आहे.

यापैकी शुद्धलेखनाच्या चुका त्यामानाने किरकोळ मानाव्यात, असा काळ दुर्दैवाने आलेला आहे. सदर पुस्तकात ऱ्हस्वदीर्घांच्या चुका तशा कमी आहेतसे म्हणावे लागेल. 'रु-रू' ही दोन स्वतंत्र अक्षरे असल्याची कल्पना अनुवादिकेस नाही, की अक्षरजुळणी करणारास नाही, हे निश्चित सांगता येणे कठीण! अनुस्वार, रफारांची स्थानांतरे काही ठिकाणी असली, तरी याच कारणाने केवळ अनुवादकर्त्रीस त्याबद्दल जबाबदार धरता येत नाही.

मराठीमध्ये शब्दाला जोडून प्रत्यय लिहिला जातो. सामासिक शब्दही एकत्रित लिहिले जातात. या जाणिवेचाही पूर्ण अभाव आहे. 'सुद्धा, 'देखील' हे शब्दयोगी बहुतेक वेळा सुटेच मुद्रित झाले आहेत. 'कुक्कुट पालन केन्द्र' (पृ. ९). 'माझ्या समोर' (१०), 'तिच्या विषयीचे' (१८), 'विचार पद्धती सुद्धा' (२६), 'सूत्र बद्ध' (२७) ही काही वानगीदाखल उदाहरणे! अशी पानोपानी आहेत आणि शुद्धलेखनाबाबत विशेष जागरूक नसणाऱ्या सर्वसाधारण वाचकालाही खुपतील इतकी ढोबळ आहेत.

शब्दस्तरावरील चुका दोन भिन्न भाषिक संस्कृतींमधला वेगळेपणा नीट ध्यानात न आल्याने अनेकजणांकडून होत असतात. परंतु त्या किती असाव्यात, याला येथे काही प्रमाणच नाही.

इंग्रजीतील 'फ्रेंड' संदर्भाने 'मित्र' किंवा 'मैत्रीण' होऊन यायला हवा. प्रस्तुत अनुवादात या पर्यायांचे भान शून्यवत आहे. 'मैत्रीण' कुठे दिसतच नाही. सर्वत्र 'मित्र' येतो. आत्मचरित्रलेखिका सनातनी मुस्लिम वातावरणातली आहे. तिनं सहजपणाने मुलामुलींना भेटावे-बोलावे, अशी परिस्थिती दिसत नाही, हे पाहिल्यावर हा अनुवाद संशयास्पद वाटू लागतो. पृ. १८९ वर तर चूक उघडच दिसते. 'सलमान तासीर आणि त्याचा दोस्त... तवलीन सिंग' असा उल्लेख येतो. थोडेफार सामान्यज्ञान असणारा सर्वसाधारण वाचकही यातील चूक काढू शकेल. आणि ही माहिती समजा नसली, तरीही पुढच्या काही वाक्यानंतर तवलीन सिंगबद्दल 'ती प्रख्यात भारतीय पत्रकार होती.' असा उल्लेख येतोच. परंतु या दोन वाक्यांमध्ये काही व्याकरणिक विसंगती आहे, हे अनुवादकर्त्रीच्या मात्र ध्यानात येत नाही.

'दीर' ऐवजी 'मेहुणा', 'भाची' ऐवजी 'पुतणी' अशा गफलतीही बारकाईने वाचू लागल्यास लक्षात येतात. brother-in-law, niece इ. नातेवाचक शब्दांचे विविध मराठी पर्याय इथे लक्षातच घेतलेले नाहीत.

'गुड/बॅड स्टार'चे भाषांतर मराठीत 'ग्रहा'ऐवजी शब्दश: 'तारा' झालेले पाहून अनुवादिका मराठी भाषाव्यवहाराशी कितपत परिचित आहे, याबद्दल शंकाच



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

येऊ लागते.

शब्दशः भाषांतर करताना काही चुकीचे वाक्प्रयोगही निर्माण झाले आहेत. त्यामुळे अर्थहानीही झालेली आहे. उदा., पृ. ७२ वर 'मुस्तफा आणि अदिला बरोबर गेले' असे वाक्य येते. संदर्भ आहे त्यांच्या अनुरूपतेचा! मूळ इंग्रजी वाक्प्रयोग 'to go with' असा असणार. यासाठी 'सारख्याला वारखा' वगैरे विविध समर्पक वाक्यप्रयोग मराठीत उपलब्ध आहेत. 'त्यांचे एकमेकांशी बरोबर जमले.' असे साधे सरळ वाक्यही योग्य ठरले असते. 'बरोबर गेले' यातून निष्पन्न होणारा अर्थ तिथे विसंगतीच निर्माण करतो.

विभक्तिप्रत्यय आणि शब्दयोगी अव्ययांचा चुकीचा वापर हा आणखी एक ठळक दिसणारा दोष म्हणता येईल.

मराठी भाषेत फक्त 'जहाजावर' 'बोटीवर' वगैरे प्रवासी असतात. इतरत्र 'आत' असतात. त्यामुळे 'विमानावरील... परदेशवासीयाशी' (पृ. ६१) हे खटकणारच.

'माझ्या लोकांशी माझ्या काही जबाबदाऱ्या आहेत.' (पृ. २९) 'या वस्तुस्थितीशी माझी सहानुभूती निर्माण झाली.' (पृ. ७०) असे सरसकट ठोकळेबाज प्रत्यय वापरून केलेले भाषांतर बऱ्याच ठिकाणी आढळते. 'विषयी', 'बद्दल', 'मुळे' इ. पर्यायांचा विचार वास्तविक तिथे व्हायला हवा. 'माझी सहानुभूती निर्माण झाली.' हेही अयोग्यच आहे. सरळ 'मला सहानुभूती वाटली' तरी हवे किंवा 'माझ्या मनात सहानुभूती निर्माण झाली.' असे तरी हवे.

'एकत्र काम करणे त्या दोघांचे प्राणघातक ठरणार होते.' (पृ. ६४) या वाक्याचा काय अर्थ लावायचा? 'त्या दोघांना' हवे असून प्रत्यय चुकला की 'त्या दोघांचे काम करणे (अन्य कुणाला) प्राणघातक ठरणार होते' असे म्हणायचे आहे?

मराठी भाषेत वाक्यातील शब्द काही विशिष्ट क्रमाने बांधलेले असतात; तो क्रम इंग्रजीपेक्षा वेगळा आहे, त्यात लिंगवचनक्रियापदांची सुसंगती लागते, सामान्य रूपांची योजना होते. याची दखलही नसलेली कुरचित वाक्ये असंख्य आहेत.

'त्याचा पुढारी सदसद्विवेकहीन त्याच्या रक्ताला ललचावलेल्या राजवटीशी... संघर्ष करीत होता...' (पृ. १५२) 'लहानग्या हमजाने त्याच्या वडिलांच्या राजवाड्याभोवती असलेल्या प्रचंड भिंतीचे... तसेच अन्य साऱ्या गोष्टी वर्णन करून सांगू लागला.' (पृ. २६), 'शामियाना घातले होते.' (पृ. २८), 'माझ्यापेक्षा २२ वर्षांनी मोठा आणि अनेक वेळा विवाह केलेल्या मुस्तफाशी...' (पृ. ६२) 'आम्ही जेव्हा मित्रांमध्ये आणि राजकीय दोस्तांमध्ये असताना त्याचा आत्मविश्वास



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

होता की, त्याची पत्नी त्याच्या कार्यावर पूर्ण विश्वास ठेवते आणि गरज पडली, तर त्याच्या कार्याचे ती समर्थन करील.' (पृ. १३५)

गुंतागुंतीची सदोष वाक्ये लिहिण्यापेक्षा साध्या, छोट्या निर्दोष केवलवाक्यांमध्ये त्याचे रूपांतर केले असते, तर अनुवादाचे स्वरूप कदाचित सुधारले असते. परंतु अनुवादिकेस धातुसाधितांच्या उपयुक्ततेची पुरेशी जाणीव नाही. त्यामुळे वाक्यांना सुटसुटीत रूप देणे, शक्य असूनही साधत नाही.

उदा., 'जो वर्ग विचार करतो आणि जागरूकपणे निर्णय घेतो, जो वर्ग जन्म म्हणजे योगायोग, असे न मानता आपल्याला सोयीची जागा शोधण्यासाठी धडपडतो, अशा वर्गाची मी होते.' (पृ. २९)

याऐवजी 'जागरूकपणे विचारपूर्वक निर्णय घेणाऱ्या आणि जन्म हा योगायोग मानण्याऐवजी आपल्याला योग्य ते स्थान मिळवण्यासाठी धडपडणाऱ्या वर्गातली मी होते.' असे काहीतरी वाक्य उचित ठरले असते.

'त्याने स्वतः जी रचना (लष्करी) उभारली होती, तीच बरखास्त करण्याचा आणि स्वतःच निवडलेल्या पंतप्रधान महमदखान जुनेजोची बडतर्फी करण्याचा **त्याचा** निर्णय ही त्याची सर्वांत मोठी चूक होती.' या इंग्रजी वळणाच्या रचनेपेक्षा '**आपणच** उभारलेल्या लष्करी रचनेची बरखास्ती आणि आपणच निवडलेल्या... जुनेजोंची बडतर्फी करण्याचा त्याचा निर्णय सर्वांत चुकीचा होता.' हे मराठी वळणाचे आणि आकलनसुलभ झाले असते.

क्लिष्ट किंवा सदोष वाक्ये का होईनात, अर्थ समजत असेल, तर वाचक सहन करील. परंतु काही ठिकाणी तेही अशक्य होते. 'मृत राजकारणी माणूस हा कुणाचा तरी वारस बनतो. मुस्तफाला लोकांसाठी स्वतःचा वारस निर्माण करण्याची गरज होती.' (पृ. ६०) याचा काय अर्थ संभवू शकतो? शरणागती पत्करण्यावाचून इथे काही गत्यंतर उरत नाही.

इंग्रजीमधून मराठी किंवा अन्य भारतीय भाषांमध्ये अनुवाद करताना आदरार्थी बहुवचन हाही घटक लक्षात ठेवावा लागतो. एरवी तो अनुवाद यथायोग्य ठरत नाही. सदर अनुवादकर्त्रीने याही घटकाचे भान ठेवलेले नाही. परिणामी अनेकदा विसंगती आली आहे. निवेदनाचा मूळ सूरही निश्चितपणे बदलला गेला असावा, हेही खूपदा जाणवते. उदा., तहमिना दुराणी आपल्या पतीविषयी लिहीत आहेत. सुरुवातीच्या दोन-तीन पृष्ठांवर त्यासाठी आदरार्थी ब. व. 'स्वामी', 'पती' अशी संबोधने येतात. चौथ्या पृष्ठापासून अचानक एकेरी उल्लेख सुरू होतो. एका वाक्यात 'माझ्या सासूबाई...' असा आदरार्थी उल्लेख व नंतर लगेचच तृ. पु. ए. व मध्ये प्रयोग होतो. भुत्तो, झिया, जतोई, इ. पाकिस्तानी नेत्यासाठी मूळ लेखिका जर आवर्जून 'मि. भुत्तो' इ. संबोधने वापरीत असेल, तर त्या सुसंस्कृतपणास



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

शोभेसे आदरार्थी बहुवचन मराठीमध्ये अनुवादकर्त्रीने आणावयास नको काय?

मूळ आत्मचरित्र हे एका पाकिस्तानी सरंजामी वातावरणात वाढलेल्या खानदानी स्त्रीचे आहे, हेही अनुवादकर्त्रीने ध्यानात घ्यावयास हवे होते. केवळ इंग्रजी-मराठी भाषिक संस्कृतीचे संदर्भ येथे पुरेसे ठरले नसतेच. तर या भाषांमधून आणखी एक तिसरी निराळी संस्कृती व्यक्त होते आहे, याचेही भान राखायला हवे होते. भाषिक स्तरावरची काळजीही जिथे घेतली गेली नाही. तिथे या पुढच्या गोष्टीकडे कोण लक्ष देणार?

प्रस्तुत पुस्तक अनुवादकर्त्रीस सामाजिकदृष्ट्या महत्त्वाचे वाटले आहे. एका दुःखी स्त्रीचा आक्रोश मराठी वाचकांच्याही कानी पडावा, म्हणून श्रीमती लीला आवटे यांनी हे अनुवादकार्य हाती घेतले. परंतु या तळमळीमुळे अनुवादातील उणिवांचे समर्थन होऊच शकत नाही. खरे पाहता, सामाजिक प्रबोधनाच्या हेतूने लिहिलेली / अनुवादलेली पुस्तके तर भाषेच्या दृष्टीने जास्तीत जास्त निर्दोष असायला हवीत. तरच त्यातील आशय सर्वसाधारण वाचकांपर्यंत नेमकेपणाने पोचण्याची शक्यता निर्माण होते. त्यात अडथळे आल्याने मूळ उद्दिष्टालाच धोका पोहोचतो.

'आपण 'काय' सांगतो आहोत, ते वाचकांना धडपणे कळण्यासाठी तरी 'कसे' सांगतो आहोत. याकडे लक्ष पुरवायला हवे,' ही जाणीव मराठी ग्रंथव्यवहारात जोपासणे किती निकडीचे ठरते आहे, हे असे नमुने वाचल्यावर तीव्रतेने जाणवू लागते

७/३०, 'गौरीनंदन', महेश सोसायटी, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७

■ ■



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

## महाबँक पारितोषिक १९९७

मराठी अभ्यास परिषदेतर्फे दरवर्षी त्या अगोदरच्या दोन वर्षातील उत्कृ भाषाविषयक लेखनासाठी महाबँक पारितोषिक देण्यात येत असते. १९९५ आणि १९९ या दोन वर्षातील उत्कृष्ट भाषाविषयक लेखनाची निवड करण्यासाठी नेमलेल्य निवडसमितीने नुकताच आपला निर्णय जाहिर केला आहे. या वर्षी हे पारितोषिव प्रा. माधव देशपांडे यांच्या 'संस्कृत आणि प्राकृत भाषा' या ग्रंथाला देण्यात आले आहे. हा ग्रंथ शुभदा सारस्वत, पुणे या प्रकाशन संस्थेने प्रसिद्ध केला आहे. यावर्षीच्य निवड समितीचे प्रा. प्र. ना. परांजपे (निमंत्रक), प्रा. डॉ. नीती बडवे आणि प्रा. डॉ गं. ना. जोगळेकर हे सदस्य होते. प्रा. माधव देशपांडे यांचे अभिनंदन !



## चुकीची दुरुस्ती

'भाषा आणि जीवन' च्या १५.१ आणि १५.२ अंकांच्या आवरणपृष्ठ क्र. ३ वर दिलेली पत्रिकेच्या वर्गणीची माहिती चुकून जुन्या अंकातल्याप्रमाणे दिली गेली आहे. वास्तविक पाहता वर्गणीचे दर यापूर्वीच बदलले असून तशी सूचना १४.४ या अंकात यापूर्वीच दिली गेली आहे. तेव्हा पत्रिकेच्या ग्राहकांनी १४:४ च्या अंकात दिलेल्या दराप्रमाणेच वर्गणी पाठवावी. या अंकातही आवरणपृष्ठ ३ वर हे नवीन दर देण्यात आले आहेत याची कृपया नोंद घ्यावी. कृपया गैरसमज होऊ देऊ नयेत.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

**पैसे भरण्याबद्दल सूचना :**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद या नावाने काढावा. मनिऑर्डरकूपनवर किंवा चेकसोबतच्या चिट्ठीवर पैसे पाठवणारा नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली. ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ भर घालावी. पावती मागाहून पाठविल जाईल.

**पत्रिकेची वर्गणी :**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळूशकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

□ चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य समासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाल ६० रु.

□ चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ७५ रु.

□ सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) २० रु.

□ परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १५ डॉलर.

□ परदेशातील संस्थांसाठी वर्षाला २० डॉलर.

□ सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ६ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी :**

सामान्य सभासदांची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ ३० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ६० रु. + ३० रु. असे एकूण ९० रु. भरावे लागतील.

**जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

## ★ आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार ?

- सभासद नसाल, तर प्रथम स्वतः सभासद व्हा.
- सभासद असाल, तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण सभासद मिळवून द्या.
- परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर चिटणिसांशी संपर्क साधा.
- परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.
- परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.
- परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

## ★ आपण पत्रिकेसाठी काय करू शकता ?

- लेखन पाठवा.
- परभाषांतून अनुवाद करा.
- ग्रंथपरीक्षणे लिहा.
- 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुरांबद्दल सूचना पाठवा.
- भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.
- पत्रिकेत भाषाव्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते ?
- जाहिरात मिळवून द्या.
- संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

★ संपर्क ★

मराठी अभ्यास परिषद

१, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

दूरध्वनी : ३३ ३८ ६९






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मराठी अभ्यास परिषद